

# लेक लाडकी सासरची



तृप्ती एकबोटे देवरूखकर

# लेक लाडकी सासरची (ललित लेख संग्रह)

लेखिका : तृप्ती एकबोटे देवरुखकर

Email :- trupti.ekbote@gmail.com

Ph 9833438101

पुर्वप्रसिद्धी : दैनिक प्रहार



मुखपृष्ठ : कनक वाईकर

प्रकाशक : ई साहित्य प्रतिष्ठान
www.esahity.com

esahity@gmail.com



प्रकाशन : ११ एप्रिल २०१५

अनुक्रम

# निमंत्रण



लग्न हा प्रत्येकासाठीच महत्त्वाचा विषय असतो. कारण एका ठराविक वयापासून आयुष्य या जिव्हाळयाच्या गोष्टीच्या मागे-पुढेच गुंफलेलं असतं. दोन घरं, दोन कुटुंबं, अनेक माणसं, अनेक नाती, हजारो चालीरिती, परंपरा, आवडी-निवडी, रुसवे-फुगवे, प्रेम, माया, जिव्हाळा, आपुलकी अशा कित्येक छोट्या-छोट्या धाग्यांचे रेशीमबंध निर्माण होतात. हे बंध काळानुरूप घट्ट करत राहायचं, रेशीमबंधांचं सुंदर वस्त्र विणायचं की हे बंधच तुटू द्यायचे हे मात्र प्रत्येकावर अवलंबून असतं. माझं लग्न ठरल्यापासून, ते होईपर्यंत आणि त्यापुढचाही बराच काळ आणि अगदी आतापर्यंत मी ही सगळी प्रक्रिया अनुभवली आहेच. पण अनेकदा या सगळ्याकडे त्रयस्पथणे बघतही आले आहे. या पुस्तकात मी जे काही लिहिलंय, ते कदाचित त्यामुळेच शक्य झालं असेल. कुणालाही चूक ठरवण्याचा माझा हेतू नाही. लग्न ही गोष्ट वर आणि वधू या दोन्हींकडील माणसांच्या आयुष्यात बदल घडवतं. त्यामुळे सगळ्यांनीच एकमेकांना समजून घेणं आवश्यक असतं.

सासर आणि तिथली माणसं याबद्दल आपल्या समाजात जो बागुलबुवा करून ठेवला जातो, त्यामुळेच नवरी मुलगी मनात सासरविषयी अनेक चित्र-विचित्र संकल्पना ठेऊन, पूर्वग्रहदूषित मनानेच सासरी गृहप्रवेश करते. त्यामुळे पुढे घडणाऱ्या सर्वच घटनांना तीही तितकीच जबाबदार असते. प्रत्येक सासर म्हणजे छळवाद आणि सासरची माणसं म्हणजे जाच हा समज बदलला पाहिजे, असं मला मनापासून वाटतं. केवळ मुला-मुलींचंच नाही तर घरातल्या वडीलधाऱ्यांचंही या बाबतीत मतपरिवर्तन होणं आवश्यक आहे. कारण

सून या विषयावरही अनेक कुटुंबांमध्ये चुकीचे समज असल्याचं दिसतं. आपले सिनेमे, टीव्ही मालिका, पुस्तकं अशा अनेक माध्यमांनी सासर, सून, सासू या व्यक्तिरेखा वर्षानुवर्ष प्रचंड स्टिरिओटाइप करून ठेवल्या आहेत. त्यामुळे या नात्यांकडे बघण्याचा दृष्टिकोनच नकारात्मक झाला आहे. म्हणूनच हे पुस्तक लिहिताना एक नवा विचार देण्याचा मी मनापासून प्रयत्न केला आहे. ते वाचून आपल्याला आनंदासोबतच एका नवा दृष्टिकोन सापडला, तर नक्कीच मला आनंद होईल आणि हे लिहिण्याचा हेतू सफलही...

हे पहिलं-वहिलं पुस्तक प्रकाशित करताना यातील लेखांचा विषय असलेलं माझं संपूर्ण कुटुंब, मी लिहितं राहावं यासाठी सतत पाठपुरावा करणारा माझा नवरा आणि हा विषय सुचवणारे माझे पूर्वीचे ज्येष्ठ सहकारी महेश म्हात्रे सर यांचे मन:पूर्वक आभार. काही लेख वाचूनच या लेखांचं पुस्तक करूया, असं म्हणून माझ्या लिखाणावर विश्वास दाखवणारे सुनील सामंत आणि ई-साहित्य परिवाराचेही मनापासून आभार.

हा पहिलाच प्रयत्न आहे. तुमच्या प्रतिक्रिया आणि सूचनांची मी वाट पाहतेय. कारण यापुढे लिहितं राहण्यासाठी मला त्या नक्कीच प्रेरणा देतील.

आपली

तृप्ती

# गोष्ट माझ्या लग्नाची

*लग्न ठरणं, लग्न पार पडणं आणि लग्नानंतरचं नवं-कोरं आयुष्य हे एकाच गोष्टीचे तीन वेगवेगळे पदर आहेत. तिन्हीतली पात्र तीच फक्त परिस्थिती वेगवेगळी. या गोष्टीत कुटुंब, प्रेम, भावना, नाती असं सगळं काही अनुभवता येतं आणि तेही प्रत्यक्षात..! मी अगदी हल्लीच लग्नाच्या मांडवाखालून गेले असल्यामुळे थोडंफार निरीक्षण आणि बरचसं आत्मपरीक्षण केल्यानंतर माझ्या मनाच्या तिजोरीत साठलेले लग्न आणि त्याच्याशी संबंधित अनेक मजेदार किस्से आणि अनुभव तुमच्याशी या सदरात शेअर करणार आहे.*

'हाती मेंदी, डोळा पाणी;

उरी हुंदका, मनात गाणी'

मनाची अशीच काहीशी अवस्था मी अगदी काही दिवसांपूर्वीच अनुभवली. लग्नाला आत्ताच एक महिना पूर्ण झाला आहे, त्यामुळे अजूनही मी नववधू म्हणूनच सगळीकडे मिरवतेय. खरंतर, परीकथेतील 'त्या' राजकुमाराचं चित्र मनात पूर्ण होण्याआधीच माझं लग्न ठरलं. ऑगस्ट महिन्याच्या सहा तारखेला आम्ही पहिल्यांदा भेटलो. त्या दिवसाला सहा महिने पूर्ण झाले. या सहा महिन्यांमध्ये माझं, खरंतर आम्हा सगळ्यांचंच आयुष्य पूर्णपणे बदलून गेलं आहे. सहा महिन्यांपूर्वी एकमेकांसाठी पूर्णपणे अनोळखी असलेले आम्ही दोघं, आमच्याही नकळत एकमेकांच्या आयुष्यातला सगळ्यात महत्त्वाचा घटक बनलो. मला वाटतं हीच नियोजित (अरेंज्ड) लग्नांची गम्मत आहे.

आधी एक औपचारिक भेट, मग मेसेजेस, मग तासन्तास फोनवर मारलेल्या गप्पा, दर विकेंडला भेटण्याची ओढ, कधी जेवणाचा प्लान तर कधी सिनेमाचा, कधी नुसतंच

या दरम्यान मला खूप विचित्र प्रश्नही पडू लागले होते. म्हणजे मुलगी फक्त लग्नाच्या दिवशी 'नवरी' आणि दुसऱ्या दिवशीपासून 'बायको' बनते पण मुलगा मात्र आयुष्यभर नवराच राहतो, असं का? आणि गम्मत म्हणजे यावरही मला 'कळेलच.. कळेलच' असंच उत्तर मिळत होतं.

समुद्रकिनारी बसून केलेलं स्वप्नरंजन.. खरं तर लग्न ठरल्यापासून ते होईपर्यंतचा काळ या सगळयात खूप पटकन निघून जातो. पण दोघांचं नातं फुलण्यासाठी हाच काळ सगळयात महत्त्वाचा आणि अत्यावश्यक असतो. त्यामुळे साखरपुडा आणि लग्न यात किमान चार महिन्यांचं अंतर असावं असं मला तरी वाटतं.

लग्नाच्या या सगळया गोष्टींची सुरुवात होते ती 'मुलगा पाहणं' या पारंपरिक तरी अत्यंत मनोरंजक कार्यक्रमाने. मला नेहमी असा प्रश्न पडायचा की लग्नासारखा, संपूर्ण आयुष्याचा प्रश्न असलेला निर्णय असा अध्या तासाच्या भेटीत कसा घ्यायचा? पण माझ्या वेळी ती अध्या तासाची भेट आम्ही दोघंही बडबडे असल्यामुळे दोन तासांची झाली आणि आमचा निर्णय घरी पोहोचेपर्यंत जवळजवळ पक्का झाला होता. खरंतर आमच्या घरच्यांनी पारंपरिक कांदेपोह्यांच्या कार्यक्रमाला बगल देत आधी आम्ही दोघांनीच भेटावं असं ठरवलं. त्यामुळेच आम्हाला एकमेकांशी अधिक मोकळेपणाने बोलता आलं, स्वभावांचा अंदाज आला, विचार कळले आणि आमची पहिल्याच भेटीत चक्क मैत्री झाली. त्यामुळे माझा मुलगा बघण्याचा आणि त्याचा मुलगी बघण्याचा, इतरांना सहसा बोअिरग वाटणारा, कार्यक्रम आमच्यासाठी इंटरेस्टिंग झाला होता.

एरवी कांदेपोह्यांच्या कार्यक्रमात त्या बिचाऱ्या मुला-मुलीला सोडून इतर गावगप्पाच अधिक होतात. इतक्यात कुणाला तरी कार्यक्रमाचा मूळ उद्देश आठवतो आणि मग 'तुम्ही हवं तर प्रश्न विचारा एकमेकांना' अशी मुभा दिली जाते पण एवढय़ा लोकांसमोर प्रश्न तरी काय विचारणार आणि उत्तरं तरी काय देणार! म्हणून मग काही न बोलता-विचारताच, केवळ दिसण्यावर आणि घरातल्या इतर व्यक्तींकडे पाहूनच एकमेकांना होकार किंवा नकार कळवण्याची वेळ येते आणि मग लग्नाचा जुगार खेळला जातो. म्हणजे जर जोडीदार चांगला निघाला तर डाव आपला नाहीतर सगळीच गणितं चुकतात आणि लग्नाच्या नावावर केवळ तडजोड म्हणून एका छप्पराखाली दोन व्यक्ती वर्षानुवर्ष एकत्र राहतात.

बरं, योग्य जोडीदाराची निवड करताना काही ठरावीक ठोकताळे, नियम वगैरे नसतातच. बुद्धी अनेक गोष्टी पडताळत असते; पत्रिका, नोकरी, घर, घरातली माणसं, मित्र, व्यसनं असं बरंच काही, पण मन एक कौल देत असतं आणि ज्यांना तो कौल नीट ऐकता आला त्यांची निवड सहसा चुकत नाही.

एकदा लग्न ठरल्यावर मात्र अनेक गोष्टींचा मनात कल्लोळ सुरू होतो. प्रत्येक गोष्ट करत असताना लग्नानंतर आपल्याला आधी आपण करत असलेल्या गोष्टी करायला मिळतील का, असे विचार मनात येत राहतात. मैत्रिणींसोबत फिरताना, शॉपिंग करताना, सिनेमा बघताना, ऑफिसला जाताना, अगदी मोठय़ा आवाजात हसतानाही. त्यात लग्न ठरल्यानंतर आजूबाजूच्या लोकांचा आपल्याकडे बघण्याचा दृष्टिकोनच बदलून गेलेला असतो. एकीकडे आपल्यासाठी सगळे खूप आनंदी असल्याचं सांगून शुभेच्छा देत असतात आणि दुसरीकडे आधीच गोंधळून गेलेल्या मुलीला आणखी अस्वस्थ करण्याचा चंग बांधल्यासारखे वागतात. आपण कुठल्याही गोष्टीचा आनंद घेत असलो की, ‘करून घे मजा, आता लग्न व्हायचंय ना’ किंवा लग्न ठरल्यानंतर येणाऱ्या प्रत्येक सणाला ‘हा तुझा शेवटचा सण’ असं काहीतरी विचित्र बोलत राहतात. माझं लग्न आहे की मी तुरुंगात शिक्षा भोगायला चालले आहे हेच मला अशा लोकांच्या बोलण्यावरून लक्षात येत नव्हतं.

त्यात आपल्याकडे ‘सासू’ या नात्याला उगीचच एक काळी, खलनायकी छटा देण्याची पद्धत आहे. लग्न ठरल्यापासूनच माझ्या ‘अनुभवी’ मैत्रिणी, बहिणी, शेजार-पाजारच्या, ऑफिसमधल्या बायका अशा समस्त स्त्री-जातीच्या प्रतिनिधींनी स्वत:चे अनुभव माझ्याशी शेअर करण्याच्या नावावर खरंतर मला घाबरवण्याचाच खूप प्रयत्न आरंभला होता. जेवणापासून, कपडय़ांपर्यंत आणि टिकलीपासून अगदी रोजच्या प्रवासाच्या सवयीपर्यंत ‘कळेल. कळेलच’ अशी एकच प्रतिक्रिया नियमित ऐकायला मिळत होती. काहीवेळा मी ‘माझा नवरा असा नाहीये, माझी सासू अशी नाहीये’ असं सांगण्याचा प्रयत्न केला पण संसाराचे ‘अनुभवी’ बोल बोलत असलेल्या माझ्या प्रिय सख्या त्यावरही ‘सहा

महिने थांब फक्त, त्यानंतर हेच बोलतेस का बघूच' असं मलाच आव्हान देऊ लागल्या. मग या लग्न-संसाराच्या खेळात अजून लिंबू-टिंबू असलेली मी, त्यांच्याशी हुज्जत घालणं सोडून हे सल्ले एन्जॉय करायला सुरुवात केली.

या दरम्यान मला खूप विचित्र प्रश्नही पडू लागले होते. म्हणजे मुलगी फक्त लग्नाच्या दिवशी 'नवरी' आणि दुसऱ्या दिवशीपासून 'बायको' बनते पण मुलगा मात्र आयुष्यभर नवराच राहतो, असं का? आणि गम्मत म्हणजे यावरही मला 'कळेलच.. कळेलच' असंच उत्तर मिळत होतं.

असो, कुठलेही पूर्वग्रह मनात न ठेवता नवीन घरात जायचं असं माझं आधीच ठरलं होतं. मी संसार वगैरे याबद्दल बोलण्यासाठी अजून तशी नवीनच आहे पण माती मऊ असतानाच तिला योग्य आकार दिला तर उत्तम कलाकृती घडते. त्यामुळे नव्या घरातले सुरुवातीचे हे शिकण्याचे आणि समजून घेण्याचे दिवस, थोडक्यात माझ्या 'ट्रेनिंग पिरीयड'ची मी सध्या तरी खूप मजा घेतेय.

एक गोष्ट लक्षात घ्यायला हवी की आपण मुली जसं आपलं घर, कुटुंब सोडून नवीन घरी राहायला जात असतो तसंच ते घरही एका नवीन माणसाला घरात, कुटुंबात सामावून घेण्याचा प्रयत्न करत असतं. आपल्या आणि त्या कुटुंबाच्या अनेक वर्षांच्या सवयी, दैनंदिन आयुष्य या सगळयावरच त्याचा परिणाम होत असतो. घरी एखादा पाहुणा आला तरी त्याच्यासाठी काही दिवस जागा करताना आपल्या नाकी नऊ येतात आणि इथे तर कायमसाठी एका व्यक्तीला आपल्या घरात आणि त्याहीपेक्षा आपल्या कुटुंबात सामावून घेणं हे तेवढं सोपं नक्कीच नाही. दोन्ही बाजूंनी थोडा प्रयत्न करणं हा त्यावरचा एकमेव उपाय आहे.

माझे सासू-सासरे आणि नवरा गेली अनेक वर्ष घरात तिघंच राहत होते पण आता मी आल्यानंतर त्यांनी मला असं काही आपलंसं करून घेतलं आहे की पाच दिवस माहेरपणाला गेल्यानंतरही माझं तिथे लक्ष लागत नव्हतं आणि त्यांनाही इथे माझ्याशिवाय करमत नव्हतं. शेवटी मी माहेरचा मुक्काम एक दिवस आधीच गुंडाळून परत माझ्या नवीन

घरी आले. मला केवळ महिन्याभरातच हे घर माझं वाटू लागलंय याचं श्रेय खरं तर त्या घरातल्या माणसांचंच आहे. जसं माहेरी होतं अगदी तसंच मी या घरातल्या प्रत्येकाशी मोकळेपणाने बोलू शकते, अगदी सासऱ्यांशीदेखील माझ्या बाबांसोबत बोलायचे तशा गप्पा मारू शकते. मला माझ्या घराची आठवण येऊ नये म्हणून माझा नवरा माझा मित्र झाला, सासू-सासरे आई-बाबा झाले आणि नणंदा मैत्रिणी झाल्या. माझ्या सवयी त्यांनी आत्मसात केल्या. आणि त्यामुळेच या घरात रुळायला मला एक आठवडाही लागला नाही.

अर्थात, या बाबतीत प्रत्येकाचे अनुभव वेगळे असतात. पण माझ्या निरीक्षणाप्रमाणे अनेकदा 'सासर' याविषयीच्या चुकीच्या समजुतींमुळे आणि नव्या नवरीच्या पूर्वग्रहदूषित मनामुळेच अनेक वाद निर्माण होतात. ते थोडय़ाफार प्रमाणात असणारच पण अनेकदा ते टाळता येण्यासारखे असतात. सासर म्हणजे सासुरवास ही चुकीची समजूत आपल्या समाजातून हळूहळू नामशेष व्हायला हवी. लग्न ठरलेल्या मुलीला सासरची आणि तिथल्या माणसांची भीती दाखवण्यापेक्षा आपल्या चांगल्या अनुभवांतून तिचा आत्मविश्वास वाढवायला हवा. तरच ती साफ मानाने आणि सकारात्मक दृष्टिकोन सोबत घेऊन नव्या घरात प्रवेश करू शकते. लग्न दोन माणसांचं नाही तर दोन कुटुंबांचं असतं आणि असावं. दोन्ही पक्षातल्या लोकांनी एकमेकांच्या अडचणी समजून सगळं निभावून नेलं की सोहळाही छान होतो आणि मनंही दुखावली जात नाहीत. कारण लग्नात आहेराच्या साडय़ा किंवा रुखवताचं सामान महत्त्वाचं नसून एका नव्या नात्याची होणारी सुरुवात आणि त्यानिमित्तानं जोडली जाणारी दोन घरं आणि त्यातली माणसं सगळयात जास्त महत्त्वाची असतात.

# नावात काय आहे?

*आपण जन्माला येतो ते निव्वळ एक बाळ म्हणून, आपलं नाव आपल्याला ओळख मिळवून देतं. कुठल्याही मुलीच्या अस्तित्वाचा अविभाज्य घटक असलेलं, प्राणपणाने जपलेलं, कुणी प्रेमाने ठेवलेल्या टोपणनावाचं मूळ असलेलं नाव एका झटक्यात केवळ लग्न झालं म्हणून तिची मर्जीही न जाणून घेता बदलून टाकणं, अशा विचित्र प्रथा आपल्याकडच्या लग्नांमध्ये का असतात, याचं उत्तर कदाचित कुणाकडेही नसावं..*

माझ्या या सदरातल्या पहिल्या म्हणजेच गेल्या गुरुवारच्या लेखाला दिलेल्या उत्स्फूर्त प्रतिसादाबद्दल सर्वप्रथम वाचकांचे खूप खूप आभार! माझा तो लेख वाचून माझी आई खूपच भावूक झाली होती. मी माझ्या नावात दोन्हीकडची आडनावं लावली या गोष्टीचं तिला सगळयात जास्त कौतुक वाटलं. त्यावर मी तिला म्हटलं की, हे तर स्वाभाविकच आहे कारण जर तुम्ही मला लिहायला-वाचायला शिकवलंच नसतं तर मी कधी हा लेख लिहूच शकले नसते. तिला आणि बाबांना मात्र माझ्याकडून अगदी सहज घडलेल्या या कृतीचा खूप अभिमान वाटला. तिच्याशी झालेल्या त्या संभाषणानंतर एका गोष्टीची मला प्रकर्षाने जाणीव झाली, आपण कितीही म्हटलं की 'नावात काय आहे' तरी आपलं नाव हा आपल्या अस्तित्वाचा सर्वात मोठा घटक असतोच. आपल्याकडे लग्नातही नाव या विषयाशी निगडित अनेक गमतीजमती असतात. म्हणजे नाव घेणं, बायकोचं नाव बदलणं, नवऱ्याला नावाने हाक मारणं ते अगदी 'नावं ठेवणं', सगळयातच नावाची भूमिका मोठी! नावात काय आहे हे खरं तर या वेळी उमगतं.

जेव्हा माझं नाव लग्नानंतर बदलण्याचा विषय समोर आला तेव्हा मी त्याला सपशेल नकार दिला होता. सुदैवाने त्यासाठी मला कुणाची मनधरणी करावी लागली नाही की जीवाचा आटापिटा करावा

नवऱ्याला 'अहो' आणि बायकोला 'अगं' म्हणणाऱ्या जोडप्यांमध्ये कायम एक असमानता राहते. आपल्याकडे बाईला ती पुरुषापेक्षा सर्वार्थाने कमी आहे, कायम त्याच्यावर अवलंबून आहे, असं बजावण्यासाठी म्हणूनच अशा पद्धती रूढ करण्यात आल्या असाव्यात, असं माझं ठाम मत आहे. आपल्या रूढी-परंपरांचा मीही प्रचंड आदर करते पण जे निर्थक आणि असमानता निर्माण करणारं आहे ते सोडून देणंच योग्य! नवऱ्याबद्दलचा आदर ही दाखवण्याची नाही तर बाळगण्याची गोष्ट आहे.

लागला नाही. माझ्या विचारांचा माझ्या नवऱ्याने आणि सासरच्यांनी आदर केला आणि माझ्या आई-वडिलांनी माझ्या जन्मानंतर कौतुकाने सोहळा करून ठेवलेलं माझं नाव कायम राहिलं. एकदा माझ्या नवऱ्याने मला 'काय हरकत आहे नाव बदलायला' असं गमतीने विचारलं. त्यावर मी त्याला इतकंच म्हटलं की 'मुलीचं लग्नात नाव बदलण्यामागचं एक तर्कशुद्ध कारण तू मला दे आणि खुशाल माझं नाव बदल.' त्यानंतर पुन्हा जेव्हा हा विषय निघाला तेव्हा मी त्याला विचारलं की 'आता, तुझ्या वयाच्या २८व्या वर्षानंतर मी अचानक एक दिवस तुझं नाव बदललं तर तुला कसं वाटेल?' मला आठवतं, त्या दिवसानंतर आमच्या बोलण्यात हा विषय कधीच आला नाही. एवढंच काय, तर लग्नाच्या वेळी जेव्हा 'काय नाव ठेवणार रे!' अशी त्याच्या नातवाईकांकडून विचारणा झाली तेव्हा तो परस्परच कशाला बदलायचं नाव, हे नाव चांगलंच आहे असं म्हणू लागला. याचाच अर्थ माझं म्हणणं त्याला पटवून देण्यात मी शंभर टक्के यशस्वी झाले होते.

लग्नात मुलीचं नाव बदलण्यामागचं तर्कशुद्ध कारण आपल्यापैकी कुणालाच माहीत नसावं. पूर्वापार एखादी पद्धत चालत आली आहे म्हणून एखादी गोष्ट करायची, याला खरं तर काहीच अर्थ नाही. ज्या नावाने मुलीच्या अस्तित्वाला पहिल्यांदा ओळख मिळाली ते नाव बदलणं म्हणजे तिचं लग्नाआधीचं अस्तित्वच नाकारण्यासारखं नाही का? कदाचित ही पद्धत सुरू होण्यामागचं कारणही हेच असेल. कारण आपल्या समाजव्यवस्थेत मुलीने नवीन आयुष्याची सुरुवात करताना सहसा तिच्या संपूर्ण भूतकाळाची लग्नाच्या होमकुंडात आहुती द्यायची अशी पद्धत आहे, त्यात नावही आलंच.

काही जणींना ही काही फार मोठी गोष्टच नाही, असं वाटतं, पण मैत्रिणींनो, आपला जन्म झाल्यानंतर आपल्या आई-वडिलांनी किती कौतुकाने अनेक नावांचे अर्थ शोधत, काही नावांवरून एकमेकांशी वाद घालून मग कुठे एक नाव आपल्यासाठी ठरवलं असेल. अत्यंत प्रेमाने, धुमधडाक्यात बारसं करून आपल्याला हे नाव दिलं असेल. आपण आजवर कमावलेली सगळी प्रशस्तीपत्रकं, बक्षिसं एवढंच काय तर मोबाइल, इंटरनेटचं बिल

आणि अगदी बँकेतलं खातंदेखील ज्या नावावर आहे, ते नाव अचानक कुणीतरी केवळ आपल्यावर स्वत:चा हक्क प्रस्थापित करण्यासाठी म्हणून बदलत असेल तर ते योग्य नाही. मुळात आपली ओळख परस्पर बदलण्याचा अधिकार कुणालाच नाही.

आता हा लेख वाचणाऱ्या अनेक काकूंना हे आगाऊपणाचं वाटत असेल खरं, पण निदान माझं नाव बदलण्याचा विषय झाला होता तेव्हा माझ्या डोक्यात हे सारे विचार आले होते. अगदी असंच प्रत्येकाला वाटावं हे काही गरजेचं नाही. कुणी सांगावं, काही जणींना कदाचित त्यांचं नाव आवडतही नसेल आणि निदान लग्नाच्या निमित्ताने ते बदलतंय म्हणून त्या खूशही होत असतील. आडनावाचंही थोडय़ाफार प्रमाणात तसंच आहे, पण आपण एका नवीन कुटुंबाचा भाग होत असताना त्यांची ओळख आत्मसात करण्यासाठी आणि आपल्या पुढच्या पिढीला ती आपल्याकडून मिळण्यासाठी सासरकडचं आडनाव स्वीकारायलाच हवं. परंतु माझ्या मते, त्यासाठी माहेरच्या आडनावाचा त्याग करण्याची काहीच आवश्यकता नाही. लग्न म्हणजे आपल्याला विधी, कपडे, आमंत्रणं, दागिने, नवं घर असं सगळं वरवरचंच वाटत असतं, पण खरं तर लग्न या सगळयाहून खूप वेगळा, असा छोटय़ा-छोटय़ा गोष्टींचा, अनुभवांचा, नव्या-जुन्या विचारांचा आणि प्रथांचा एकत्रित सोहळा असतो.

मुलीला एकीकडे आईबाबांचं घर सोडून जायचं म्हणून वाईट वाटत असतं आणि दुसरीकडे नव्या घरात सासू-सासऱ्यांना, नवऱ्याला हाक काय मारायची, इथपासून सगळे प्रश्न पडलेले असतात. मी तर सासू-सासऱ्यांना लग्न ठरल्यापासूनच आई-बाबा बनवलं आणि नवऱ्यालाही सुरुवातीपासून नावाने हाक मारत होते त्यामुळे पुढे तेच कायम राहिलं. माझ्या सासरी खरं तर या गोष्टीवर कुणाचाही आक्षेप नाही पण माहेरी मावशी, आजी वगैरे मला अनेकदा म्हणतात ‘अगं, नावाने काय हाक मारतेस, ‘अहो’ म्हणावं’ आणि त्यावर माझं उत्तर असतं की, तोसुद्धा मला ‘अगं’ऐवजी ‘अहो’, तृप्ती, ऐकलंत का? असं म्हणणार असेल तर मला ‘अहो’ म्हणायला काहीच हरकत नाही.’ माझ्या या उत्तरामुळे मी त्यांना अनेकदा

अगोचर वगैरे वाटते, पण चालायचंच! मला वाटतं, प्रश्न जर मान देण्याचाच असेल तर तो दोघांनीही एकमेकांना द्यायला हवा. नाहीतर समोर असताना ‘अहो’ म्हणायचं आणि इतर वेळी ऑफिसमध्ये, माहेरी, ट्रेनमधल्या मैत्रिणींसमोर ‘तो माझा नवरा’ असं म्हणायचं. त्यापेक्षा मी चारचौघांमध्ये बिनदिक्कत ‘माझा सागर’ असा प्रामाणिकपणे माझ्या नवऱ्याचा उल्लेख करते. त्यात मानही आला आणि प्रेमही!

माझ्या निरीक्षणाप्रमाणे एकमेकांना नावाने हाक मारणाऱ्या जोडप्यांच्या नात्यामध्ये एक वेगळीच सहजता आणि पारदर्शकता दिसते. याउलट नवऱ्याला ‘अहो’ आणि बायकोला ‘अगं’ म्हणणाऱ्या जोडप्यांमध्ये कायम एक असमानता राहते. आपल्याकडे बाईला ती पुरुषापेक्षा सर्वार्थाने कमी आहे, कायम त्याच्यावर अवलंबून आहे, असं बजावण्यासाठी म्हणूनच अशा पद्धती रूढ करण्यात आल्या असाव्यात, असं माझं ठाम मत आहे. आपल्या रूढी-परंपरांचा मीही प्रचंड आदर करते पण जे निरर्थक आणि असमानता निर्माण करणारं आहे ते सोडून देणंच योग्य! नवऱ्याबद्दलचा आदर ही दाखवण्याची नाही तर बाळगण्याची गोष्ट आहे. नवरा-बायकोचं नातं हक्काचं, मैत्रीचं आणि पारदर्शक असलं तर पुढची वाट सुकर होते. त्याची सुरुवात नावापासून होते असं म्हणायला हरकत नाही कारण कुठलंही स्थळ आलं की आपण आधी नाव विचारतो आणि म्हणूनच एकमेकांच्या नावांचा आदर करून एकमेकांना नावाने संबोधणं ही खरं तर एका सुंदर नात्याची सुरुवात होऊ शकते.

# थोडं तुझं, थोडं माझं!

*कुठल्याही लग्नाच्या नंतरचा काही काळ मुलीसाठी आणि त्या घरातल्या माणसांसाठी अत्यंत महत्त्वाचा असतो. जर या दिवसांमध्ये एकमेकांना समजून, सांभाळून घेतलं नाही तर पुढे त्याचे अप्रिय परिणाम होताना दिसतात. परक्या घरातून आलेली परकी मुलगी आपलीशी करण्यासाठी घरातल्यांनी आणि नवं घर आपलंसं करण्यासाठी मुलीने, अशा दोन्ही बाजूंनी प्रयत्न होणं आवश्यक असतं.*

आपण आपल्याच तंद्रीत जगत असतो. घर, ऑफिस, मित्र-मैत्रिणी, शॉपिंग, सिनेमे, पिकनिक्स, पार्टीज असं सगळं नियमित सुरू असतं आणि एक दिवस 'अचानक' आपलं लग्न होतं. हो, लग्नाची तयारी कितीही दिवस सुरू असली तरी लग्न 'अचानक'च झाल्यासारखंच वाटतं पण आपल्या आयुष्यात खूप मोठी उलाढाल झाली आहे हे लक्षात यायला मात्र थोडा वेळ लागतो. आपण ज्या दिवसाची आतुरतेने वाट पाहत असतो तो आपल्या लग्नाचा दिवस येतो आणि निघूनही जातो पण खरी कसोटी सुरू होते त्यानंतर!

नव्या घरात जुळवून घेण्यासाठी कुणाला किती वेळ लागेल हे काही सांगता येत नाही. ते प्रत्येकाच्या स्वभावावरही अवलंबून आहे. लग्न ठरल्यानंतर काही दिवसांतच माझं मात्र इथल्या घरातल्या लोकांबरोबर चांगलंच 'ट्युनिंग' झालं होतं. त्यामुळे मला इथे रुळायला तसा वेळ लागला नाही. पण फक्त घरातल्या माणसांसोबत सूर जुळून भागत

मुळात घरी आलेली सून ही आपल्या कुटुंबाचा भाग आहे, हेच अनेक लोक मान्य करत नाहीत. अनेकदा तिने उत्साहाने केलेल्या गोष्टींना किंवा पदार्थांना "आमच्याकडे हे असं नाही करत" असं म्हणून तिचा हिरमोड केला जातो. तिच्याकडून अजाणतेपणी झालेल्या लहान-सहान चुकांचाही मोठा विषय केला जातो. मग कालांतराने तिचा घरात काही करण्याचा उत्साहच मावळतो आणि मग सून घरात काही करतच नाही असा शिक्कामोर्तबही तिच्यावर केला जातो.

नाही तर संपूर्ण राहणीमान जुळवून घ्यायचं असतं. भाजीच्या चवीपासून कपडय़ाच्या घडीपर्यंत सगळंच नवीन असतं. या नावीन्याचं अप्रूपही वाटत असतं आणि दडपणही येत असतं. माझं लग्न ठरल्यापासून मी आजूबाजूच्या लग्न झालेल्या स्त्रियांचं उगीच निरीक्षण करू लागले होते. त्या कशा वागतात, कसे कपडे घालतात, लग्नानंतरच्या अनुभवांबद्दल काय बोलतात वगैरे पण त्यामुळे माझा संभ्रम अजून वाढत होता. कारण मला लग्न झाल्यानंतर आयुष्य आणखी सुंदर होतं, असं सांगणारं जवळजवळ कुणीच सापडलं नाही. प्रत्येक जण तक्रारींचा मोठा खजिनाच माझ्या समोर घेऊन येऊ लागला.

"काही नाही गं, एकदा लग्न झालं की बाईचं स्वत:चं काही आयुष्य उरतंच नाही, येईल तुलासुद्धा अनुभव!" असं लग्नाला काही वर्षं होऊन गेलेल्या माझ्या मैत्रिणींनी जेव्हा मला सांगितलं तेव्हा तर मी पुरतीच हादरले. आपण लग्नाची घाई तर करत नाही ना, आपलं स्वत:साठीचं आयुष्यच संपून जाणार, अजून कितीतरी गोष्टी करायच्या बाकी आहेत, कुठून सुरुवात करू, लग्नाआधी काय काय करू अशा प्रश्नांनी मला भंडावून सोडलं होतं. माझी ही अवस्था पाहून माझ्या नवऱ्याने मला विश्वास दिला की तुझ्या व्यक्तिस्वातंत्र्याच्या आड मी कधीही येणार नाही. अनेकांना या फक्त बोलायच्या गोष्टी वाटतात पण गेल्या ६-७ महिन्यांत मी हे प्रत्यक्ष अनुभवलं आहे. खरं तर या बाबतीत सासरकडच्या लोकांना आणि नवीन सुनेला, दोघांनाही काही गोष्टींची जाणीव असणं फार गरजेचं आहे. मी लग्नाआधी जीन्स आणि टीशर्ट किंवा कुर्ती असे सुटसुटीत कपडे घालण्याला प्राधान्य देत होते पण लग्नानंतर माझी वेशभूषा थोडी तरी बदलणार यासाठी मी मनाची आधीच तयारी केली होती. लग्नानंतर काही दिवस साडय़ा, मग ड्रेसेस आणि आता ऑफिसमध्ये किंवा नवऱ्यासोबत फिरायला जाताना मी सर्रास जीन्स वापरते. महत्त्वाचं म्हणजे त्यावर कुणी आक्षेप घेत नाही कारण मी देखील सवय नसताना साडय़ा आणि ड्रेसेस कटकट न करता घातले आणि आता मला त्याची सवयसुद्धा झाली आणि आवडूही लागलं आहे. याला तडजोड नाही म्हणता येणार तर हा दोन्ही बाजूंचा समजूतदारपणा आहे.

याबाबतीत अनेकदा मुलाला आणि सुनेला वेगवेगळे कायदे लागू झालेले मी पाहिले आहेत. म्हणजे मुलगा रात्री घरी कितीही वाजता आला तरी हरकत नाही पण सुनेला

अर्धा तास उशीर झाला तरी त्याचा मोठा विषय अनेक ठिकाणी होतो. घरातली कामं करण्याबाबतही तसंच! माझा एक सहकारी तर पुरुषांनी घरातली कामं करण्याच्या पूर्ण विरोधात आहे आणि अशा मानसिकतेच्या अनेक व्यक्ती आपल्याला आसपास पाहायला मिळतात. खरं तर या गोष्टी आई-वडिलांनीच आपल्या मुलांना शिकवायच्या असतात. सहजीवन म्हणजे 'तू कर, मी फक्त खातो' असं होत नाही. माझ्या नवऱ्याने लग्नाआधी जेव्हा मी घरातली सगळी कामं करतो असं मला सांगितलं तेव्हा खरं तर माझा अजिबात विश्वास बसला नव्हता पण आता मी हे खरंच अनुभवतेय. माझ्या घरातल्या किंवा बाहेरच्या कुठल्याही कामात त्याचा मदतीचा हात कायम पुढे असतो आणि मला या गोष्टीचा अभिमानही वाटतो आणि माझा त्याच्याबद्दलचा आदर आणखी वाढतो. आता, "या गोष्टी लग्न नवीन आहे म्हणून काही दिवसांपुरत्याच आहेत" असं मला अनेकांकडून सांगितलं जातं पण निदान त्याची कामात मदत करण्याची तयारी आहे, एवढंच माझ्यासाठी पुरेसं आहे.

गळयात मंगळसूत्र घातलं म्हणून काही एका दिवसात लगेच मुलीची बाई होत नाही. काल-परवापर्यंत आई-वडिलांच्या घरात बिनधोकपणे कुठल्याही जबाबदारीशिवाय बागडणारी मुलगी जेव्हा संपूर्ण अनोळखी घरात कायमची येते तेव्हा एका दिवसात तिला सगळं काही येण्याची, तिचा स्वभाव, सवयी, आवडी-निवडी बदलण्याची अपेक्षा करणं योग्य नाही. तिला थोडा वेळ द्यायला हवा. ती पुढाकार घेऊन एखादी गोष्ट करत असेल तर त्याला प्रोत्साहन द्यायला हवं. मुळात घरी आलेली सून ही आपल्या कुटुंबाचा भाग आहे, हेच अनेक लोक मान्य करत नाहीत. अनेकदा तिने उत्साहाने केलेल्या गोष्टींना किंवा पदार्थांना "आमच्याकडे हे असं नाही करत" असं म्हणून तिचा हिरमोड केला जातो. तिच्याकडून अजाणतेपणी झालेल्या लहान-सहान चुकांचाही मोठा विषय केला जातो. मग कालांतराने तिचा घरात काही करण्याचा उत्साहच मावळतो आणि मग सून घरात काही करतच नाही असा शिक्कामोर्तबही तिच्यावर केला जातो. मी हे माझ्या जवळच्या अनेक कुटुंबांमध्ये होताना पाहिलं आहे.

अनेकदा मुलीही हीच चूक करतात. मग 'आमच्याकडे' असं आणि 'तुमच्याकडे' तसं या वादात ही कुटुंब कायम अडकून पडतात आणि कालांतराने नात्यांमधली दरी रुंदावत

जाते. जेवण, सणवार, व्रत-वैकल्यांच्या बाबतीत माहेरच्या पद्धतींना चिकटून राहण्यापेक्षा नवीन घरातल्या नवीन पद्धती शिकून त्या पुढे चालू ठेवणं केव्हाही इष्टच! मी आणि माझ्या नवऱ्याने सुरुवातीपासूनच काही गोष्ट जाणीवपूर्वक टाळल्या आणि काही सवयी मुद्दाम लावून घेतल्या. जसं, आम्हा दोघांपैकी कुणीही 'माझे' किंवा 'तुझे' असा नातेवाइकांबद्दल, घराबद्दल, वस्तूंबद्दल उल्लेख केला की आम्ही लगेच एकमेकांना टोकतो. जे काही आहे ते 'आपलं' आहे आणि माझ्या अनुभवानुसार याचा खरंच आपल्या आणि संपूर्ण कुटुंबाच्या मानसिकतेवर खूप सकारात्मक परिणाम होतो. खरं तर, लग्न म्हणजे नवरा-नवरीसोबत घरातल्या प्रत्येकासाठीच आयुष्याच्या एका नवीन पर्वाची सुरुवात असते, आईची सासू होत असते, वडिलांचे सासरे होत असतात तर बहिणीची नणंद होत असते. नात्यांमध्ये होणारे हे सगळे बदल ठरवलं तर खूप सुखदायी होऊ शकतात. एकमेकांकडचं चांगलं ते घेऊन, या नवीन पर्वाची सुरुवात केली तर सगळयांसाठीच गोष्टी सुकर होतात.

मी स्वत:ला माझ्या सासरच्या घरात एकरूप करण्यासाठी काही गोष्टी प्रयत्नपूर्वक करते. तसेच प्रयत्न मला सामावून घेण्यासाठी इथली माणसंही करताना दिसतात. या घरात रुळण्यासाठी आवश्यक वेळ इथल्या लोकांनी मला दिला आहे आणि मला त्यांच्यात एकरूप करून घेण्यासाठी मीही त्यांना तितकाच वेळ देत आहे आणि मला खात्री आहे की पुढे हा वेळच आमच्यातली नाती भक्कम करणारा दुवा ठरणार आहे.

# मधुचंद्राचे मंतरलेले दिवस

*फेब्रुवारी महिना उजाडला आणि सगळीकडे प्रेमाचे वारे वाहू लागलेत. गुलाबी थंडीत रस्त्यांच्या कडेच्या दुकानांपासून मेलबॉक्स मध्ये येणाऱ्या हजारो ऑफर्सच्या ई मेल्स पर्यंत संपूर्ण माहोल लाल-गुलाबी झालेला आहे. याच पार्श्वभूमीवर 'मधुचंद्र' म्हणजेच 'हनिमून' या फारश्या लिहिल्या-वाचल्या न जाणाऱ्या विषयावर थोडं लिहिण्याचा प्रयत्न करतेय. माझ्या मधुचंद्राच्या काही मधुर आठवणी तुमच्यासोबत इथे शेअर करतेय.*

'हनीमून' म्हणजेच 'मधुचंद्र' ही संकल्पना ज्याने कुणी निर्माण केली असेल तो खरंच ग्रेट असला पाहिजे. आपण अजूनही या विषयावर हळूहळू कानगोष्टीच करतो पण खरंतर ह्या सुंदर अनुभवाबद्दल बोललंच पाहिजे.

"आमच्यावेळी नव्हतं हो असलं काही" असं म्हणणारी पिढी आता जवळजवळ संपुष्टात आली आहे आणि आपली पिढी या शब्दाला चांगलीच सरावली आहे. कारण लग्नानंतरच्या हनीमूनआधी नोकरीमधला 'हनीमून पिरीयड' आपण अनुभवत असतोच.

लग्न आणि नोकरी दोन्हीमध्ये हा 'पिरीयड' किती कालावधीचा असेल याला काही ठराविक बंधन नाही; कधी दोन महिने, कधी सहा महिने तर कधी वर्षभरही! थोडक्यात 'हनीमून पिरीयड' म्हणजे आपल्या भाषेत 'नव्याचे नऊ दिवस'!

अशाच एका निवांत संध्याकाळी आम्ही फिरून रिसोर्टवर परतत होतो. गल्लीत वळलो आणि समोर पूर्णाकृती चंद्र एका अनोख्याच तेजाने चकाकत होता किंवा मला तो तसा भासत होता. माझी नजर आणि मन त्याच्या दर्शनाने प्रचंड सुखावले होते, तो मनात खोल-खोल उतरत चालला होता आणि हातात माझ्यावर अतोनात प्रेम करणाऱ्या माझ्या जन्माच्या जोडीदाराचा हात होता; त्या संध्याकाळी, त्या ठिकाणी, मला 'मधुचंद्र' या शब्दाचा खरा अर्थ समजला होता.

असो, असं म्हणतात कुठल्याही व्यक्तीची खरी ओळख प्रवासादरम्यानच होते. म्हणूनच शाळेतल्या किंवा कॉलेजमधल्या मित्र-मैत्रिणींची मैत्री सहली नंतर अधिक घट्ट होते. वर्षातून एकदातरी एकत्र सहलीला जाणाऱ्या कुटुंबांमध्येही हे पहायला मिळतं. मग दोन अनोळखी व्यक्तींची एकमेकांना खरी ओळख होण्यासाठी प्रवासाहून अधिक योग्य काही असूच शकत नाही.

आपण 'मधुचंद्र' ही संकल्पना खूपच साचेबद्ध करून टाकली आहे. नवीन नवरा-नवरीने खऱ्या अर्थी वैवाहिक आयुष्याची सुरुवात करण्यासाठीची सहल एवढाच अर्थ ह्यातून अनेकांना अभिप्रेत असतो. हा अर्थ कितीही योग्य असला तरी तो तेवढाच नाहीए एवढं नक्की! खरंतर 'एकमेकांचा सहवास' हा मधुचंद्राच्या संपूर्ण प्रथेतला सर्वात महत्वाचा घटक आहे. एकदा दैनंदिन जीवनाला सुरुवात झाल्यानंतर एकमेकांसाठी असा खास राखीव वेळ फार कमी वाटयाला येतो. त्यामुळे लग्नानंतरचे हे काही दिवस फक्त आणि फक्त एकमेकांसोबत घालवणं अत्यावश्यक आहे.

हनीमूनचा सरसकट अर्थ नवदाम्पत्याने एकमेकांसोबत पहिल्यांदा प्रवासाला जाणे एवढाच असला तरी त्यात अनेक छोटया-मोठया मजेदार गोष्टीही दडलेल्या आहेत. कदाचित म्हणूनच या विषयावर सिनेमे बनवण्याची कल्पनाही काही निर्मात्यांना सुचली असावी. पण सिनेमे आणि वास्तव यात खूप फरक असतो. म्हणजे हनीमूनला गेल्यानंतर डोंगर-दऱ्यांमध्ये जाउन गाणी-बिणी गाणं असं वास्तवात काही होत नसतं. पण ही सहल 'आईस ब्रेकर' चं काम नक्कीच करते. म्हणजेच नवीन जोडप्यात असलेला वागण्या-बोलण्यातला एकप्रकारचा संकोच ह्या सहलीमुळे दूर होतो. शिवाय लग्नाच्या तयारीमुळे, विधींच्या गडबडीमुळे आणि पाहुण्यांच्या गजबजाटामुळे थकून गेलेल्या मनाला आणि शरीराला आलेला शीण घालवण्यासाठीही ही सहल हवीच!

आपल्याकडे ही संकल्पना अर्थात पाश्चिमात्य देशांकडून आली आणि कालौघात लग्नाशी निगडीत आपल्या इतर अनेक प्रथा-पद्धतींपैकी एक होऊन आपलीशी

झाली. म्हणूनच लग्न ठरल्यापासूनच 'हनीमूनला कुठे जाणार' अशी विचारणा नातेवाईकांपासून मित्र-मैत्रिणींपर्यंत सगळयांकडून सुरु होते. जणू काही लग्नाच्या बैठकीत सर्वात आधी हाच मुद्दा चर्चेला घेतलेला असतो. माझ्या निरीक्षणाप्रमाणे तर इतरांनाच वधू-वरांच्या ह्या सहलीचं जास्त कुतूहल असतं. ते दोघं बिच्चारे तर या विषयावर एकमेकांशी बोललेलेही नसतात.

आधी हा विषय काढायलाच मुळात अवघडल्यासारखं वाटत असतं. सुरुवात कुणी करायची असा प्रश्न पडलेला असतो. साखरपुडा झाल्यानंतर कसाबसा हा विषय निघतो. त्यानंतर जायचं कुठे? हा यक्षप्रश्न अनेक जोडप्यांना पडलेला दिसतो. सहसा नवरदेवच या संपूर्ण सहलीचं आयोजन करत असल्यामुळे नियोजित लग्नांमध्ये काही वेळा तर मुलीला फक्त कुठे जाणार आहोत हे सांगितलं जातं, विचारलं जात नाही. पण बरेचदा मुलगा-मुलगी ह्या गोष्टी मिळूनच ठरवतात आणि त्यातच खरी गम्मत आहे.

आमचं लग्न ऐन सहलींच्या सिझनमध्ये, म्हणजे डिसेंबर मध्ये असल्यामुळे ऑगस्टमध्ये साखरपुडा झाल्यानंतर काही दिवसांनीच आम्ही हनिमूनसाठी स्थळ संशोधनाला लागलो. आम्हा दोघांनाही डोंगर-दऱ्यांपेक्षा समुद्रकिनारे अधिक प्रिय असल्याने उत्तरेकडचा भारत आमच्या यादीतून आधीच बाद झाला होता. दक्षिणेतली अनेक बेटं आणि दक्षिण भारतातल्या अनेक सहलींच्या वेळापत्रकांची चाचपणी करूनही मनासारखं काहीच हाती लागत नव्हतं. असाच ऑक्टोबर महिना उजाडला आता मात्र आम्हाला डिसेंबर मधलं बुकिंग मिळण्याची शक्यता खूपच कमी झाली होती. एवढ्यात एका मित्राने मागच्या वर्षी त्याच्या हनीमूनचं बुकिंग केलेल्या कंपनीची माहिती आम्हाला दिली. तरी अजून ठिकाण निश्चित व्हायचं होतंच.

मग आम्ही दोघांनी एकत्र बसून थोडी चर्चा केली आणि ३-४ दिवसांसाठी प्रचंड खर्च करून कुठेतरी लांब जाऊन दिवसभर 'स्पॉट्स' बघत हिंडून आणखी दमण्यापेक्षा ओळखीच्याच पण दोघांच्याही आवडत्या ठिकाणी चांगलं आठवडाभर

जाण्याच्या विचारावर एकमताने शिक्कामोर्तब झालं. कारण आम्हाला पर्यटन स्थळं बघत दिवसभर फिरत राहण्यापेक्षा एकमेकांसाठी अधिक वेळ हवा होता. मग अर्थात आमचं 'गोव्या'ला जाण्याचं नक्की झालं.

अर्थात इथे जाण्याआधीही अनेकांनी आमचं 'मार्गदर्शन' करण्याचा प्रयत्न केलाच पण आम्ही मात्र कुणाचं काहीही ऐकायचं नाही असं ठरवलंच होतं. मैत्री तर आमची आधीच झालेली होती त्यामुळे ही सहल आम्ही भरपूर एन्जॉय करणार होतो यात शंकाच नव्हती.

गोवा आम्ही दोघांनीही आधी पाहिलेलं असलं तरी यावेळी ते आम्हाला नवीन भासत होतं. भारतीय पर्यटकांमध्ये फारसं प्रसिद्ध नसलेल्या 'कॆंडोलीम' नावाच्या गोव्यातल्या एका सुधारित गावात आम्ही राहिलो होतो. थिविम स्टेशनला उतरून या गावात जाण्यासाठी पुढे एक-दीड तासाचा प्रवास करावा लागतो. आम्हाला रिसोर्टवाल्यांनी स्टेशनवरून आणण्यासाठी गाडी पाठवली होतीच. आम्हाला पाहिल्यावर तिथल्या मराठी स्थानिकांना मात्र खूप आनंद व्हायचा. आमच्या तिथल्या गाडीचा ड्राईव्हर, आम्ही रात्री जेवायला जायचो तिथला वेटर असे अनेक मराठी भाषिक आमची आपुलकीने चौकशी करत कारण इंग्रजी किंवा गोवन, कोकणी भाषा बोलणाऱ्यांचं प्रमाण या भागात अधिक असल्याने मराठी बोलणारे पर्यटक तिथे आल्यावर त्यांना अप्रूप वाटत होतं. तिथे रशियन पर्यटकांचा सुळसुळाट इतका होता की भारतीय पर्यटक अगदी क्वचितच नजरेस पडत होते. इतकंच काय तर तिथल्या प्रत्येक रेस्टोरन्टच्या बाहेर दिवसाचा मेन्यू इंग्रजीसोबत रशियन भाषेतही लिहिलेला आहे, मग मेन्यू मध्ये रशियन पदार्थ नसतील तर नवलच! पण तिथल्या रशियन सुळसुळाटाचा एक फायदा मात्र असा की त्यांच्यामुळे इथल्या हॉटेल्समध्ये उत्तम आणि तत्पर सोयी-सुविधा, सुई पासून वाईनपर्यंत सगळं काही मिळणारे दोन मोठ्ठी चकाचक सुपरमार्केट्स, एका कॉलवर रिसोर्टच्या दारात हजर होणारी गाडी अशा अनेक सुविधा ह्या छोटयाश्या गावातही उपलब्ध झाल्या आहेत. यासोबतच आम्हाला अत्यंत आवश्यक

असलेली शांतता इथे लाभली कारण हे विदेशी पर्यटक मुळात शांतता प्रिय असतात. आम्ही ज्या रिसोर्ट मध्ये राहत होतो तिथले अनेक अपार्टमेंट्स तर काही रशियन पर्यटकांनी विकतच घेतलेले आहेत, ते सुट्टीमध्ये इथे येउन इथल्या सुंदर, शांत समुद्रकिनाऱ्यावर आपला वेळ मजेत घालवतात.

विशेषतः इथली संध्याकाळ अत्यंत सुंदर होती. रस्त्याच्या दोन्ही कडेला असलेली, समुद्रकिनाऱ्यावर दूरवर पसरलेली दिवसा अगदी साधारण वाटणारी, बाहेरून मोकळी असलेली कौलारू रेस्टोरन्ट्स आणि दुकानं संध्याकाळी मात्र नवीन आणि वेगळंच रूप परिधान करायची. दर संध्याकाळी प्रत्येक रेस्टोरन्टमध्ये तिथले स्थानिक कलाकार इंग्रजी, रशियन तर कधी हिंदी गाणी सादर करत. तिथल्या मंद दिव्यांच्या आणि संगीताच्या साथीने मन धुंद होऊन जात होतं. दरम्यान, नाताळ जवळ आलेला असल्यामुळे संपूर्ण वातावरणात एक अनोखं चैतन्य भरलेलं होतं.

इथल्या शांत, सुंदर वातावरणात आमचंही नातं फुलत होतं. दिवसागणिक एकमेकांच्या सवयी, आवडी लक्षात घेऊन, एकमेकांची काळजी घेत खरंतर आम्हीच एकमेकांसाठी सवयीचे होत होतो. हे दिवस खरंच मंतरल्यासारखे भासत होते. अशाच एका निवांत संध्याकाळी आम्ही फिरून रिसोर्टवर परतत होतो. गल्लीत वळलो आणि समोर पूर्णाकृती चंद्र एका अनोख्याच तेजाने चकाकत होता किंवा मला तो तसा भासत होता. माझी नजर आणि मन त्याच्या दर्शनाने प्रचंड सुखावले होते, तो मनात खोल-खोल उतरत चालला होता आणि हातात माझ्यावर अतोनात प्रेम करणाऱ्या माझ्या जन्माच्या जोडीदाराचा हात होता; त्या संध्याकाळी, त्या ठिकाणी, मला 'मधुचंद्र' या शब्दाचा खरा अर्थ समजला होता.

# संसार दोघींचा

*एकाच म्यानात दोन तलवारी राहू शकत नाहीत असं म्हणतात मात्र समई लावताना दोन वाती एकत्रच जाळाव्या लागतात; तरच अंधारी जागा प्रकाशाने उजळून निघते. सासू-सुनेमधल्या पारंपारिक वादात मला शिरायचं नाही. कारण त्याविषयी आधीच बऱ्याच जणांनी लिहून, बोलून झालंय. मुळात सासू-सुन हे नातं केवळ भांडण्यासाठी आणि एकमेकींच्या कुरापती काढण्यासाठीच आहे असा समज काहींनी जणू स्वतःच्या मनोरंजनासाठीच सर्वत्र पसरवून ठेवलाय. वास्तवात या अनोख्या नात्याचे अनेक पैलू आहेत, त्यांचे स्वतंत्र विचार आहेत आणि समस्याही आहेत. या नात्याला एका नव्या दृष्टिकोनातून पाहण्याची वेळ आली आहे.*

मायले माय म्हणता ओठांले ओठ भिडे।
चुलतीले काकी म्हणता अंतर किती पडे।।
जिजीला जिजी म्हणता झाला जिभेला निवारा।
सासूला सासू म्हणता गेला तोंडातून वारा।।

बहिणाबाईंच्या या ओळींचं वर्णन करताना सिंधुताई सपकाळ आपल्या आत्मचरित्रात, 'मी वनवासी'मध्ये लिहितात की "सासू-सुनांच्या नात्यामधला विस्तव हा आपल्या संस्कृतीला लागलेला शाप आहे, का? याचं उत्तर वरील ओळींमधून बहिणाबाईंनी शोधलं आहे". पण प्रत्यक्षात मला मात्र वाटत नाही की या अनोख्या नात्याच्या गुंत्याची उकल खुद्द परमेश्वराकडेही असेल. हे नातं आहेच इतकं मजेशीर! सासू नसणाऱ्यांना कदाचित सासूची किंमत कधीच कळणार नाही आणि सून नसणाऱ्यांना तिच्या असण्यातली गम्मत कधी लक्षात येणार नाही.

खरंच, सासू-सुनेचं नातं जगवेगळंच असतं. सुरुवातीला कच्च्या कैरी इतकं आंबट असलं तरी काळाच्या मधुर पाकात मुरत जाऊन चविष्ट मोरंब्या इतकंच ते हवंहवसं होतं. वास्तविक, सासू-सून अशा द्विपात्री बहुअंकी नाटकाचा प्रेक्षक म्हणून आस्वाद घेणं मनोरंजक आहे पण स्वतःवर जेव्हा त्यातली एक कुठलीही भूमिका पेलण्याची वेळ येते तेव्हा खरी कसोटी लागते. खरंतर दोन्ही भूमिका पेलण्याची वेळ

काही दिवसांपूर्वी बऱ्याच अवधी नंतर एक मैत्रीण ऑनलाईन भेटली. तिच्या लग्नाला आता जवळजवळ चार वर्ष उलटून गेली असतील. एक मूलही झालंय. माझी चौकशी करताना एकदम भावूक झाली आणि म्हणू लागली

"सासूसोबत राहणारेस? म्हणजे संसारसुखाचा अनुभव काही मिळायचा नाही तुला". मी एकदम दचकले. म्हटलं "असं का म्हणतेस, अगं माझा नवा संसार आहे". त्यावर ती म्हणाली "तुझा कुठे तो तर तुझ्या सासूबाईंचा संसार आहे".

जवळपास प्रत्येक स्त्री वर येतेच पण त्यातही 'सासू' च्या भूमिकेचे दोन पैलू असतात; म्हणजे 'ती'ची सासू आणि 'त्या'ची सासू असे! पैकी सामान्यतः त्याची सासू अत्यंत हळवी, भित्री आणि सतत जावयाला संतुष्ट ठेवण्यासाठी जीवाचा आटापिटा करणारी असते तर तिची सासू निर्धारी, काहीशी अहंकारी आणि सुनेला सतत पाण्यात पाहणारी असते, असा सर्वमान्य समज आहे. पण हा काही नियम नाही. मग सासू किंवा सून बनताना मन पूर्वग्रहदुषित करून आपली भूमिका ठरवून टाकण्यापेक्षा आधी एकमेकीना थोडा वेळ देऊन, पारखून मग आपल्या वागण्याचा रोख ठरवायला काय हरकत आहे.

मी सासू आहे म्हणून दुष्टच वागलं पाहिजे, आणि मी सून आहे म्हणून खाष्टच वागायला हवं असं काही कुठे लिहिलेलं नाही. हो, आपल्या स्त्री वर्गाच्या आयुष्याचा अविभाज्य घटक असलेल्या टीव्हीवरच्या दैनंदिन मालिकांनी स्वतःचं मीटर धावतं ठेवण्यासाठी मात्र हा नियम आपल्यावर जणू लादूनच टाकलाय.

पूर्वीच्या काळी नकळत्या, कोवळया वयात मुलींची लग्न व्हायची. भातुकलीच्या खेळात रमलेल्या त्या पोरसवदा लेकींना घर-संसाराच्या रहाटगाड्याची कल्पनाही नसायची. अशावेळी घरातली सारी कामे, पाहुण्यांची उठबस, बाजारहाट, धुणी-भांडी असं बरंच काही या नवविवाहितांना शिकवण्याची, समजावण्याची जबाबदारी अर्थात सासूबाईंवर पडायची. मुलाचे चुकले तर जसा मातेच्या कपाळी दोष जातो तसा सुनेचे चुकले तरी दोष सासूलाच असे मग सासू आपल्यावरचा दोष सुनेच्या माहेरवर लादून मोकळी होत असे. आपल्या लहान लेकरांना जितक्या सहजपणे रागावून, ओरडून एखादी गोष्ट आई समजावत असते तशीच पण काहीशा अधिक कठोरतेने ती सुनेला समजावली जायची. त्यात मायासुद्धा असायचीच, कारण त्यामुळेच कालांतराने सुनेने सासूला सासूबाई न म्हणता आई म्हणण्याची किंवा घरातली मुले ज्या नावाने हाक मारतात त्या नावाने (मम्मी, मम्मा, माई, आक्का) हाक मारण्याची पद्धत रुजली असावी.

मला कायम ह्या एका नात्याविषयी प्रचंड कुतूहल वाटत असायचं. अनेकींच्या अनेक कथा-कहाण्या ऐकत, अनुभवत मी देखील मनाची तयारी करत होते. माझ्या नवऱ्याने पहिल्याच भेटीत मला एक गोष्ट अगदी स्पष्ट सांगितली होती कि काहीही झालं तरी आई-बाबांना सोडून वेगळं राहण्याचा विषय कधीही काढायचा नाही. मी त्यावर संमती दर्शक मन डोलावली खरी पण पुढे काय वाढून ठेवलं आहे याचा मला तेव्हा अंदाज नव्हता.

सुदैवाने माझे सासू-सासरे आणि घरातली इतर माणसेही अगदी थोडयाच कालावधीत माझ्या जिव्हाळयाची झाली आणि त्यांच्याशिवाय वेगळं राहण्याची कल्पनाही मनाला कधी शिवेल असं वाटत नाही. तशी वेळ कधी येऊही नये असं मनापासून वाटतं.

काही दिवसांपूर्वी बऱ्याच अवधी नंतर एक मैत्रीण ऑनलाईन भेटली. तिच्या लग्नाला आता जवळजवळ चार वर्ष उलटून गेली असतील. एक मूलही झालंय. माझी चौकशी करताना एकदम भावूक झाली आणि म्हणू लागली "सासूसोबत राहणारेस? म्हणजे संसारसुखाचा अनुभव काही मिळायचा नाही तुला". मी एकदम दचकले. म्हटलं "असं का म्हणतेस, अगं माझा नवा संसार आहे". त्यावर ती म्हणाली "तुझा कुठे तो तर तुझ्या सासूबाईंचा संसार आहे". पुढे स्वतःचे अनुभव सांगताना ती म्हणाली, "आमच्याकडे बघ, लग्नाला चार वर्ष होऊन गेली पण घरातला एकही निर्णय घेण्याचं स्वातंत्र्य मला नाही, अगदी कोणती भाजी करायची हेही नाही. स्वयंपाकघरातला माझा वावरही अगदी नावापुरताच असतो कारण ते स्वयंपाकघर माझंसुद्धा आहे असं मला कधी कुणी जाणवूच दिलं नाही. माझ्या आईने आवडीने मला रुखवतात दिलेल्या सगळया संसारोपयोगी वस्तू तशाच माळयावर पडून आहेत. असं वाटतं माझा स्वतःचा संसार असता तर किती हौसेने केलं असतं मी सगळं..." आणि पुढे बराच वेळ तिचं आपलं हे पुराण सुरु होतं. पण या संभाषणानंतर मी एकदम अंतर्मुख झाले. माझ्या या मैत्रिणीपुढे तरी संपूर्ण आयुष्य पडलं आहे पण माझ्या ओळखीत आणखी एक असं कुटुंब आहे ज्यांच्या नातवांची आता लग्नाची वयं झालीत तरी घरच्या सुनेची अवस्था माझ्या या मैत्रिणीसारखीच आहे आणि अशा किती सुना असतील ज्या कदाचित सासू झाल्यानंतर, स्वतःच्या सासूचा वृद्धापकाळाने मृत्यू वगैरे झाल्यानंतर यांना संसाराच्या किल्ल्या हाती मिळत असतील पण तोवर स्वतःला सून आलेली असते म्हणजे पुन्हा तेच दुष्टचक्र मागील पानावरून पुढे सुरु!

खरंतर, यात पूर्णपणे सासूचा दोष नाही. काडी-काडी करून जमवलेला संसार अचानक एक दिवस नव्या स्त्रीच्या स्वाधीन करण्याचा मोठेपणा कुठल्याही स्त्रीच्या ठिकाणी असणं फार दुर्मिळ आहे. मग अशावेळी सुनेनंच पुढाकार घेऊन, प्रसंगी संघर्ष करून आपला हक्क घरात प्रस्थापित करायलाच हवा. आणि ज्या सासवांना सुनेला घरातला हक्क मुळी द्यायचाच नसेल त्यांनी निदान तिच्या संसार मार्गावर अडथळा तरी बनू नये, असं माझं प्रामाणिक मत आहे. माझ्या परिचयात अशी अनेक कुटुंब आहेत ज्यांनी लग्नाआधीच

मुलाच्या स्वतंत्र संसाराची सोय केलेली असते. नाहीतर घरातल्या अतिसुरक्षित वातावरणात वाढल्याने चार टक्के-टोणपे खाऊन संसार करण्याची अक्कल कुठून यायची. फक्त मुलगा जवळ रहावा म्हणून नाईलाजाने सुनेला घरात सहन करणारी कुटुंबही मी पहिली आहेत पण ह्यात तिच्या असुरक्षित मनाची आणि संसार स्वप्नांची राखरांगोळीच होत असते आणि घरातलं वातावरणही कायम दुषित होत असतं. मनाने दूर राहून एका छताखाली राहण्यापेक्षा दूर राहून मनाने जवळ राहणंच शहाणपणाचं नाही का?

याउलट सासूवरच वरचढ होऊन बसणाऱ्या अनेक सुनाही आहेतच. नवीन घरात आल्या-आल्या घराचं रूप पालटून टाकण्याच्या अट्टाहासाला पेटून अगदी झपाझप घरातली सगळी सत्ता काबीज करू पाहणाऱ्या सुनांचीही काही कमी नाही.

असं असलं तरी सासू-सुना वर्षानुवर्ष सुखा-समाधानाने एकत्र संसार करत असलेलीही अनेक कुटुंब मी अगदी जवळून पहिली आहेत. गरज असते ती थोडं मोकळं होण्याची! माझं-माझं करत एखाद्या गोष्टीला चिकटून राहण्यापेक्षा 'आपलं' म्हणून ती वाटून घेतली की प्रश्न आपोआप सुटतात. थोडीफार कुरबुर व्हायचीच. माहेरी असताना नाही का आपले आई-वडिलांसोबत मतभेद होत?

एकत्र राहायचंय अथवा नाही याचा एकदा निर्णय घेऊन मोकळं झालं तर बऱ्याच गोष्टी सुटसुटीत होतात. आमचं एकत्र राहायचं आधीच ठरलंय त्यामुळे सध्या मी आणि माझ्या सासूबाई, अशी आम्हा दोघींची एकमेकींना समजवून घेण्याची जणू कार्यशाळाच सुरु आहे. त्यांच्या वागण्या-बोलण्याचं मी खोल विश्लेषण मनातल्या मनात करत असते. त्या तसं करत नसतील कदाचित! कारण त्यांचा तो स्वभावच नाही. मी मात्र कुठल्याही छोटया गोष्टीच्या, वाक्याच्या खोलात शिरून त्याचा मागमूस काढून मोकळी झालेली असते. त्या मात्र मोकळया मनाने प्रत्येकाशी बोलणार, घरी आलेल्या कुणालाही त्या रिकाम्या हाती जाऊ देणार नाहीत. 'दिल्याने वाढतं' असं त्यांचं ब्रीदवाक्य माझा त्यांच्याबद्दलचा आदर आणखी वाढवतं. कधी त्यांचे विचार मला अगदी जुनाट वाटतात तर कधी त्या असं काहीतरी बोलून जातात की वाटतं एवढे आधुनिक विचार तर आपणही करत नाही. नुसते विचारच नाही तर कृतीतूनही त्या वेळोवेळी त्यांच्या मनाचा आधुनिकपणा दाखवून देतात.

त्यांच्या रुपात मलाही एक सहवाचक सापडलाय. माझ्या व्यतिरिक्त घरात कुणीतरी माझी पुस्तकं आवडीने बघतं आणि सवडीने वाचतं हे पाहून मला आनंदच होतो. माझ्या कुठल्याही लेखाचं वाचन त्या अगदी आवर्जून करतात. माझं कुठल्याही बाबतीत कौतुक करताना हातचं राखून बोलताना मी त्यांना कधी पाहिलेलं नाही, जे काही करणार ते अगदी मनापासून! स्वयंपाकघराबाबत मात्र त्या थोडया आग्रही आहेत पण मीसुद्धा मध्ये लुडबुड करून आपली संधी मिळवतेच! मी केलेल्या पदार्थाचंही त्या तितक्याच प्रामाणिकपणे परीक्षण करतात आणि मोकळेपणाने प्रतिक्रिया देतात. सुनेशी कसं वागायचंय हे त्यांना आणि सासूशी कसं वागायचं नाही हे मला पक्कं ठावूक आहे, त्यामुळे आमच्यातल्या संभाषणात आणि वागण्यात सहजता दिसून येतो.

हे सगळं इथे लिहिण्यामागे माझ्या सासूबाईंवर स्तुतीसुमनं उधळून त्यांच्याकडून कौतुक करून घेण्याचा माझा उद्देश नाही तर थोडासा समजूतदारपणा आणि संवादकौशल्य आपल्या आयुष्यातल्या अनेक गोष्टी सोप्या करू शकतात हे दाखवून देण्याचा आहे. माहेरी असते ती आई आणि सासरी असते ती 'आई' नामक सासू हा जुनाट आणि बिनबुडाचा समज आता नाहीसा व्हायला हवा. एकाच जन्मात आपल्याला दोन आईंची माया मिळणं भाग्याचंच मानलं पाहिजे. त्याचप्रमाणे घरात मुलगी असेल तर तिला बहिण म्हणून आपली सून घरात आली आहे आणि नसेल तर मुलगीच बनून घरात आली आहे असा सकारात्मक विचार जर सासवांनी केला तर त्या टीव्ही मालिकावाल्यांच्या तोंडात मारून दोघींनाही सुखाने संसार करणं शक्य होईल.

# रेशीमगाठी

*रेशीमगाठी नेहमी नवरा-बायको, प्रियकर-प्रेयसी यांच्यातच असतात असं काही नाही. जिथे एकमेकांबद्दल प्रेम, जिव्हाळा आणि आपुलकी निर्माण होते तिथे ही रेशमी नाती बनत जातात आणि काळाच्या अखंड प्रवासात या नात्यांच्या रेशीमगाठी घट्ट होत जातात. लग्नामध्ये नवरा-बायको या नात्यासोबतच आणखी बरीच नाती बनत असतात. दोन जीवांचं नाही तर दोन कुटुंबांचं मिलन करणाऱ्या या सोहळ्यात म्हणूनच नवरीच्या पदराला नवऱ्याच्या उपरण्याची रेशीमगाठ बांधली जाते. ही गाठ संपूर्ण परिवाराची प्रातिनिधिक गाठ असते हेच खरं!*

आपण आयुष्यातल्या बऱ्याच गोष्टी ठरवून, जुळवाजुळव करून करत असतो, जसं की लग्न! पण काही गोष्टींचा आपण कधीही विचार केलेला नसतो किंवा आपण त्या ठरवलेल्या नसतात. खरेदीला गेल्यावर ठरवलेली वस्तू विकत घेताना एखादी वस्तू अनपेक्षितपणे मोफत पदरात पडते तसा आनंद या वेळी होतो. लग्नानंतर नवरा-नवरीने सुखाने एकत्र नांदावं अशी सदिच्छा सगळेच व्यक्त करत असतात, पण त्या दोघांच्या कुटुंबांनीही गुण्या-गोविंदाने राहावं असं कुणी बोलताना दिसत नाही. खरं तर असा कुणी विचारही करत नसेल. आई-वडील आणि सासू-सासरे एकमेकांचे खूप चांगले मित्र बनल्याची उदाहरणं प्रत्यक्षात फार कमी पाहायला मिळतात. पण काही न ठरवता प्रत्यक्षात जर असं झालं तर त्यासारखं सुख नाही. हे मी तुम्हाला सांगते, कारण मी अगदी नुकतंच हे अनुभवलं आहे.

लग्न हे दोन माणसांचं असतं, असं मी कधीच मानलं नाही. लग्न कायम दोन कुटुंबांचं असतं आणि अशी

दोन दिवस अखेर बाहेरच जेवायला गेलो. तेव्हा खऱ्या अर्थी आई-बाबांचं महत्त्व आणि त्यांच्या असण्यामुळे आपण किती बिनधास्त जगतोय हे आमच्या लक्षात आलं असं म्हणायला हरकत नाही. संसार करणं ही काही भातुकलीच्या खेळाइतकी सोपी गोष्ट नाही याची आम्हाला पहिल्यांदाच जाणीव झाली. पण कसोटीच्या काळात आम्ही भक्कमपणे एकमेकांसाठी उभे होतो. एकमेकांना सावरत, मदत करत हे दिवस आम्हीही मजेत आणि भरपूर शिकण्यात घालवले.

कुटुंबं एकत्र येत येतच आपला समाज बनतो, नाही का! आमच्या दोन घरांमध्ये खरं तर सुरुवातीपासूनच चांगला संवाद होता. पण संपूर्ण कुटुंब एकजीव होण्यासाठी आमची एक सहल उपयुक्त ठरली. माझ्या बाबांचं अलिबागला म्हणजे तिथून जरा पुढे रेवदंडय़ाला घर आहे. काही दिवसांपूर्वी सलग दोन दिवस सुट्टी आली म्हणून आम्हा सगळयांचा रेवदंडय़ाचा बेत ठरला. माझ्या दोन नणंदा, त्यांची मुलं-परिवार आणि आमची दोन कुटुंबं असे आम्ही १४ जण रेवदंडय़ाला गेलो होतो. आम्ही काम-धंदे, शाळा-कॉलेजवाली मंडळी दोन दिवस भरपूर धम्माल करून परतलो, पण माझे सासू-सासरे मात्र तिथेच माझ्या आई-बाबांसोबत राहिले. खरं तर जाताना दोन्ही आई-बाबांमध्ये थोडा संकोच होता. व्याह्यांसोबत कसं राहायचं, काय बोलायचं आणि चौघंच काय करायचं, असे एक ना अनेक प्रश्न त्यांना सतावत होते. सासूबाई तर आम्ही दोनच दिवस राहणार, असं सांगत होत्या. पण वास्तवात मात्र चांगला एक आठवडय़ाचा मुक्काम करून आमची मंडळी परतली, तीसुद्धा आणखी काही दिवस राहायला हवं होतं अशी हुरहूर घेऊनच!

त्या एका सहलीने सगळी जादू घडवून आणली होती. खरं तर लग्नाच्या धामधुमीनंतर आम्हा दोघांना गोव्यात मस्त विश्रांती मिळाली होती, पण दोन्ही आई-बाबांना मात्र त्याची सक्त आवश्यकता होती. या सहलीमुळे त्यांना थोडा हवापालट झाला. संपूर्ण कुटुंब पुन्हा एकत्र आलं आणि दोन कुटुंबांची नव्याने ओळख झाली. आमचे दोन्ही आई-बाबा एक आठवडाभर एकाच छताखाली एकत्र राहिले. गावातलं वातावरण आणि एकमेकांच्या सहवासाने ही दोन्ही जोडपी ताजीतवानी झाली. दोन्ही बाबा अगदी जुन्या सवंगडय़ांसारखे रोज फिरायला जात होते, तर आई माहेरवाशीण बहिणींसारख्या सुख-दु:ख एकमेकांना वाटत मन हलकं करत होत्या. यातून नकळत आणखी दोन गोष्टी होत होत्या. मी लग्नानंतर कशा प्रकारच्या वातावरणात, कशा माणसांमध्ये राहते, वावरते आहे याचा माझ्या आई-बाबांना अंदाज आला आणि मी कुठल्या प्रकारच्या कुटुंबातून, कोणती पार्श्वभूमी घेऊन आले आहे याची माझ्या सासू-सासऱ्यांना जाणीव झाली.

का ते माहीत नाही, पण माझ्या आणि सागरच्या पहिल्या भेटीतच त्याने असं म्हटलं होतं की, आपल्या दोघांच्या आई पुढे जाऊन खूप चांगल्या मैत्रिणी होतील. तेव्हा ना तो माझ्या आईला ओळखत होता ना मी त्याच्या! पण आज त्याची भविष्यवाणी खरीच ठरली असं म्हणायला हरकत नाही. कारण तिथून परतल्यावर दोन्ही जोडय़ांची हीच

प्रतिक्रिया होती. आईला मैत्रीण नव्हे तर बहीणच भेटल्याचा आनंद होता, तर बाबांना नवीन मित्र मिळाल्याचं समाधान होतं. खरंच, आम्हा सर्वासाठीच हा एक अद्भुत आणि सुखावह अनुभव होता.

फक्त सासू-सासरेच नाही तर माझ्या नणंदाही या सहलीमुळे आई-बाबांच्या चांगल्याच जवळच्या झाल्या आहेत. आता या सगळया कुटुंबांमध्ये नियमित फोनाफोनी वगैरे सुरू असते. या सगळयातून मला मात्र अतीव समाधान मिळतंय, कारण या सगळया गाठी जुळून येण्याचं मुख्य कारण आमचं लग्न आहे. ही दोन्ही जोडपी जेव्हा सुखी रिटायर्ड आयुष्याची तिथे मजा घेत होती तेव्हा आमची मात्र इथे कसोटी लागली होती. कारण एरवी अगदी ऑफिसला निघताना हातात डबा मिळण्याची सवय असलेल्या आम्हा दोघांवर अचानक घरची सगळी जबाबदारी येऊन पडली होती. आमच्यासाठी हा खूप काही शिकवून जाणारा अनुभव होता. पहिल्याच दिवशी ऑफिसमधून घरी परतताना जेवायला काय बनवायचं, असा प्रश्न पडला तेव्हा जबाबदारीची जाणीव झाली. जेवण बनवतानाही किचनमध्ये एक-एक गोष्ट शोधताना पार तारांबळ उडून जात होती, पण त्यातही गंमत होती. मदतीला नवरा होताच. मग मीसुद्धा ऑफिसमधून आल्यावर सगळी मरगळ झटकत नवे नवे पदार्थ बनवायचे आणि सासूबाईंचा नेम न चुकवता नणंदांकडे डबा पाठवायचे. माझी भाचे कंपनी त्यामुळे मामीच्या जेवणाची चाहती बनली. तीन-चार दिवस असा क्रम सुरू असल्याने आम्ही प्रचंड दमलो आणि शेवटचे दोन दिवस अखेर बाहेरच जेवायला गेलो. तेव्हा खऱ्या अर्थी आई-बाबांचं महत्त्व आणि त्यांच्या असण्यामुळे आपण किती बिनधास्त जगतोय हे आमच्या लक्षात आलं असं म्हणायला हरकत नाही. संसार करणं ही काही भातुकलीच्या खेळाइतकी सोपी गोष्ट नाही याची आम्हाला पहिल्यांदाच जाणीव झाली. पण कसोटीच्या काळात आम्ही भक्कमपणे एकमेकांसाठी उभे होतो. एकमेकांना सावरत, मदत करत हे दिवस आम्हीही मजेत आणि भरपूर शिकण्यात घालवले. या सहलीने आई-बाबा आणि या कुटुंबांमधले ऋणानुबंध गाढ झालेच, पण आमच्यातली रेशीमगाठही आणखी थोडी घट्ट झाली हे नक्की!

# भावविश्व लग्नानंतरच्या नोकरीचे!

*लग्न आणि नोकरी हे आपल्या आयुष्यातील सर्वात महत्त्वाचे दोन विषय. या दोन घटकांची आपसात असलेली गुंतागुंत बाहेरून सहसा नजरेस पडत नाही. लग्नानंतर नोकरी करणाऱ्या मुलीच्या वैयक्तिक आयुष्यातल्या व्यथा तर वेगळ्याच, शिवाय व्यावसायिक आयुष्यातल्या व्यथाही तेवढयाच गंभीर असतात.*

माझं लग्न ठरलं तेव्हा एक गोष्ट मला लोक आवर्जून विचारायचे, “तू नोकरी करणार ना लग्नानंतर?” मी आधी या प्रश्नामुळे खूप आर्श्चचकित व्हायचे. लग्न आणि नोकरी यांचा आपसात काय संबंध असा प्रश्न मला पडायचा. पण नंतर असं लक्षात आलं की लग्नानंतर बऱ्याचशा मुली कुठल्या तरी कारणास्तव नोकरी सोडून देतात. नाही, लग्नानंतर नोकरी करायची की नाही वगैरे अशा घासून गुळगुळीत झालेल्या विषयावर मला बोलायचं नाही, तर मुलीची नोकरी आणि लग्न यांच्यात किती विचित्र संबंध लावले जातात याबद्दल सांगायचं आहे.

आपल्या आयुष्यातल्या दोन घटना अत्यंत प्रभावीपणे आपलं संपूर्ण आयुष्य बदलून टाकतात. एक, जेव्हा आपल्याला मनासारखी नोकरी मिळते आणि दुसरी, जेव्हा आपलं लग्न होतं. दोन्ही घटना आपल्या

नवव्या महिन्यांपर्यंत ऑफिसमध्ये जाऊन काम करणाऱ्या स्त्रिया तुम्हाला भोवताली नजर फिरवलीत तर सहज दिसतील. ऑफिसचं काम संपवून घरी येऊन जेवण बनवून मुलांचा अभ्यास घेणाऱ्या स्त्रिया तर अगदी शेजारच्या घरात डोकावलात तरी सापडतील. कदाचित तुमच्या स्वत:च्या घरातही असतील पण तरीही स्त्री आणि त्यातही लग्न झालेली स्त्री आणि करिअर यांचा परस्पर काहीही संबंध नाही, असं मानणारे, पुरोगामी म्हणवले जाणारे अनेक थोर जीव आपल्या आजूबाजूला सहज वावरत असतात.

आयुष्याची दिशा निश्चित करणाऱ्या, म्हणून सारख्याच महत्त्वाच्या मानल्या जातात. पण असं असलं तरी लग्न की करिअर असा प्रश्न फक्त मुलींच्याच आयुष्यात कितीही टाळलं तरी कधी ना कधी उभा राहतोच.

मुलींचं लग्न बऱ्याचदा तिच्या नोकरीवर अवलंबून असतं, तसं मुलांचंही असतं. पण गम्मत म्हणजे मुलीची नोकरीसुद्धा सर्वस्वी तिच्या लग्नावर अवलंबून असते.

मुलाच्या बाबतीत फारसे प्रश्न उद्भवत नाहीत कारण लग्नानंतर 'विवाहोच्छुक' ते 'विवाहित' असं स्टेटस बदलण्यापलीकडे त्यांच्याबाबतीत फार काही बदलत नसतं. मुलीचं मात्र नाव, आडनाव, पत्ता, आई, वडील, सवयी सगळंच बदलत असतं. पैकी 'घराचा पत्ता' हा नोकरीचा विषय नको तितका गंभीर होण्यामागचं सर्वात मोठं कारण आहे. नोकरी सहसा आपल्या राहत्या घराजवळ असते किंवा आपल्याला तिथला प्रवास सवयीचा झालेला असतो. पण लग्नानंतरचं घर नोकरीच्या ठिकाणाहून दूर असलं आणि कुठल्याही परिस्थितीत नोकरी सोडायची नाही अशी अट असली (लग्न ठरवताना अशा अटी असतात) की झालीच मुलीची फरफट सुरू! सासर दुसऱ्या शहरात असेल तर पुन्हा तिथे नोकरी शोधण्याची कसरत आहेच. म्हणूनच लग्न मुलीच्या करिअरवर थेट प्रभाव पाडत असतं.

नोकरीचं ठिकाण किंवा हुद्दा या व्यतिरिक्तही अनेक फरक लग्नानंतर मुलींना अनुभवायला मिळतात. केवळ वैयक्तिक आयुष्यातच नाही तर, कामाच्या ठिकाणीही लग्नानंतर मुलीची नोकरी किंवा नोकरी करणारी मुलगी याबाबत अनेक गैरसमजुती निर्माण होतात आणि आपल्या पुढारलेल्या म्हणवणाऱ्या समाजात त्या अत्यंत दुर्दैवी भासतात. लग्न झाल्यानंतर मुलीच्या आयुष्यात कितीही बदल झाले तरी तिच्या कामाच्या दर्जात आणि पद्धतीत बदल कसे होतील? पण लग्नानंतर होणाऱ्या अनेक स्थित्यंतरांसोबत लोकांच्या, विशेषत: सहकाऱ्यांच्या आणि वरिष्ठांच्या मानसिकतेत झालेले काही बदलही पचवावेच लागतात. तुमचं लग्न झालं म्हणजे तुम्ही कामातून गेलात अशीच बहुधा यांची धारणा होत असावी. वरवर तुमच्या लग्नाबद्दल आनंद व्यक्त करणारे तुमचे सहकारी आणि वरिष्ठ म्हणूनच लग्नानंतर तुमच्या कामाकडे अधिक बारकाईने पाहतात. त्यात एकही चूक आढळली की अप्रत्यक्षरीत्या खापर तुमच्या लग्नावर फोडलं जातं. "लग्न झाल्यापासून लक्ष नाहीए कामात! ", " लग्नानंतर आळशी झाली आहे " अशी सूचक वक्तव्य केली जातात. जणू लग्नाआधी मुलींच्या कामात एकही चूक आढळत नाही आणि लग्न झाल्यानंतर मात्र त्या तिन्ही त्रिकाळ कामं सोडून फक्त नवऱ्याचा विचार करत दिवास्वप्न पाहत बसलेल्या

असतात. प्रामाणिकपणे आणि तेवढ्याच मेहनतीने काम करणाऱ्या मुलींसाठी हे खूप चीड आणणारं ठरतं.

लग्नानंतर नवीन नोकरी शोधणं म्हणजे तर मोठं दिव्यच असतं. कारण हल्ली नुकतंच लग्न झालेल्या मुलींना नोकरी देण्यासाठी बऱ्याच कंपन्या कचरतात. ही नवविवाहिता वर्षभरातच गरोदर राहिली तर कंपनीचं केवढं तरी नुकसान होईल, असा दूरचा विचार सध्या मार्केटमध्ये प्रचलित आहे. पण त्यामुळे लग्नानंतर कुठल्याही कारणास्तव नवीन नोकरी शोधणाऱ्या तरुणींची अवस्था बिकट होते. मुंबईत एका प्रतिष्ठित कंपनीत पाच ते सहा वर्ष कार्यरत असलेली माझी मैत्रीण लग्न होऊन पुण्याला गेली तेव्हा नोकरी शोधण्यासाठी तिची झालेली तारांबळ मी कधीही विसरू शकणार नाही. तिच्या कलेचा आणि अनुभवाचा या वेळी तिला काहीही उपयोग झाला नाही. जवळजवळ तीन कंपन्यांनी केवळ नुकतंच लग्न झालं आहे म्हणून तिला नोकरी देण्यास चक्क नकार दिला होता.

लग्न म्हणजे करिअरला लागलेला ब्रेक! बाळंतपण म्हणजेही तेच असा समज कोणत्या कारणामुळे सर्वमान्य झाला आहे हेच कळत नाही. रोजंदारीवर काम करणाऱ्या ज्या स्त्रिया, ज्यांची घरं त्यांच्या दैनंदिन मिळकतीवर अवलंबून असतात, त्यांना तर हा ब्रेक परवडण्यासारखा नसतोच. त्याही स्त्रियाच आणि जीवनाच्या प्रत्येक पायरीवर संघर्ष करत त्याही काम करत राहतातच. मग सर्वसामान्य स्त्री हे पेलू शकते यावर विश्वास बसण्यासाठी वेळ का लागतो?

खरं तर लग्न, बाळंतपण आणि व्यावसायिक जबाबदाऱ्या यांची योग्य सांगड घालणं स्त्रियांना उत्तम जमतं. घर सांभाळून मोठ-मोठ्या हुद्दयांवर काम करणाऱ्या स्त्रियांची भारतात कमी नाही. अगदी नवव्या महिन्यांपर्यंत ऑफिसमध्ये जाऊन काम करणाऱ्या स्त्रिया तुम्हाला भोवताली नजर फिरवलीत तर सहज दिसतील. ऑफिसचं काम संपवून घरी येऊन जेवण बनवून मुलांचा अभ्यास घेणाऱ्या स्त्रिया तर अगदी शेजारच्या घरात डोकावलात तरी सापडतील. कदाचित तुमच्या स्वत:च्या घरातही असतील पण तरीही स्त्री आणि त्यातही लग्न झालेली स्त्री आणि करिअर यांचा परस्पर काहीही संबंध नाही, असं मानणारे, पुरोगामी म्हणवले जाणारे अनेक थोर जीव आपल्या आजूबाजूला सहज वावरत असतात. निदान माझ्या तरी आजूबाजूला आहेत.

थोडं विषयांतर होईल, पण अगदी साधं उदाहरण द्यायचं झालं तर आपल्या लोकल ट्रेनच्या फर्स्ट क्लासच्या डब्याची वाटणीच पाहा. संपूर्ण डब्याचा केवळ एक चतुर्थांश

भाग, ज्यात केवळ १३ सीट्स असतात, तो भाग स्त्रियांच्या फर्स्ट क्लास प्रवासासाठी राखून ठेवला आहे. एका सर्व्हेक्षणाप्रमाणे मुंबईतली ८० टक्के जनता लोकल ट्रेनने प्रवास करते. यातला अर्धा हिस्सा जरी स्त्रियांचा असेल तरी संपूर्ण लोकसंख्येच्या ४० टक्के महिला, त्यातल्या १० टक्के महिला जरी फर्स्ट क्लासने प्रवास करत असतील तरी आपल्या शहराच्या लोकसंख्येच्या हिशोबाने ती संख्या किती मोठी होईल हे मी सांगण्याची आवश्यकता नाही आणि त्यांच्या फर्स्ट क्लासच्या प्रवासासाठी ट्रेनच्या एका डब्यात केवळ १३ सीट्स? गर्दीच्या वेळी या डब्यांची हालत दुसऱ्या दर्जाच्या डब्यापेक्षाही वाईट असते हे तर नोकरदार स्त्रियांना दुय्यम मानण्याचं जिवंत उदाहरणच म्हणावं लागेल.

असो, तर इतकं सारं दिव्य पार करून घरी यावं तर उशीर झाला म्हणून दुर्मुखलेले चेहरे अनेक नोकरदार स्त्रियांच्या घरी वाट पाहत असतात. मुलाला कामावरून यायला उशीर झाला की "केवढं काम असतं बाई त्याला.", पण सुनेला उशीर झाला की भुवया उंचावून घडयाळाकडे बघणाऱ्या नजरा, हे अगदी सर्वसामान्य चित्र आहे.

नोकरी करणाऱ्या स्त्रिया म्हणजे स्वत:च्या पायावर उभ्या असलेल्या, कमावत्या वगैरे असं कितीही चित्र निर्माण केलं तरी विशेषत: लग्न झालेल्या स्त्रियांची परिस्थिती केवळ नोकरी करून सुधारत नाही. या महागाईच्या जमान्यात एकाच्या नोकरीत घर चालू शकत नाही म्हणून दोघांनीही नोकरी करणं अत्यावश्यक आहेच. पण स्त्रियांना नोकरी आणि घर अशी दुहेरी जबाबदारी पार पाडायची असते हेही लक्षात घ्यायला हवं. पुरुषांच्या खांद्याला खांदा लावून महिला आज प्रत्येक क्षेत्रांत काम करत असल्या तरी आपल्याकडे बायकांना कायम दुय्यम स्थान देण्याची आणि त्यांना गृहीत धरण्याची जी पद्धत अंगवळणी पडलेली आहे, ती बंद व्हायला हवी. त्यांचं करिअर हा सर्वस्वी त्यांचा निर्णय असायला हवा. तिचं लग्न झालं म्हणून तिला कामाच्या ठिकाणी अनुभवायला मिळणारी साखरेत घोळलेली कटुता आता संपायला हवी.

## जबाबदारी संपत नाही, सुरु होते

*लग्नाआधी आपण जबाबदार नसतो असं नाही, पण तेव्हा आपल्या वागण्या-बोलण्यातल्या चुका 'लहान आहे' म्हणून अनेकदा सोडून दिल्या जातात. लग्नानंतर मात्र ती संधी नसतेच. कारण नाती आणि जबाबदाऱ्या यांची वीण इतकी घट्ट आहे की त्यातून एखादी पळवाट सापडणं शक्यच नाही. हां, जे ही वीण उसकटून निघून जातात, त्यांची गोष्ट वेगळी! पण सध्या इथे हक्क आणि कर्तव्य यांचा योग्य मेळ घालून परिस्थितीचा सामना करण्यावर विश्वास असलेल्यांबद्दल आणि त्यांच्यासाठीच बोलूया.*

लहानपणी आपल्या सगळ्या योग्य-अयोग्य वागण्या-बोलण्याची जबाबदारी आई-वडील अगदी सहजपणे घेतात. जसे आपण मोठे होऊ लागतो तसे ‘आता जबाबदारीने वागा’ असं आपल्याला सांगितलं जातं. विशेषत: मुलांच्या म्हणजेच पुरुषांच्या बाबतीत हे जरा जास्तच असतं. म्हणजे मुलगा, भाऊ, नवरा, वडील अशा सगळ्याच भूमिकांमध्ये पुरुषाने जबाबदारी घ्यावी अशीच सर्वसामान्य अपेक्षा असते. जर त्या त्या वेळी परिस्थिती बिघडली तर सगळं खापर पुरुषाच्या माथी फोडून आपण बायका मोकळ्या होतो. पण स्त्री किंवा मुलगी म्हणून आपण आपल्या जबाबदाऱ्या पार पाडत असतो का? मुलगी म्हणून आपणही अनेक गोष्टींसाठी आणि अनेक नात्यांप्रती जबाबदार आहोतच.

खरं तर आई-वडिलांचं मुलीशी असलेलं नातं अद्‌भुतच म्हणायला हवं. ज्या मुलीला तळहाताच्या फोडासारखं आयुष्यभर जपायचं तिची पाठवणी करण्यासाठी केवढं धैर्य

आपणा मुलींचं आयुष्य ही मला कधीतरी मोठी गंमत वाटते. लग्न होईपर्यंत आई-वडील ‘परक्याचं धन’ म्हणून ‘तुला एक दिवस तुझ्या घरी जायचंय’असं सांगत आपली जपणूक करतात, आपल्याला वाढवतात. आणि सासरी आल्यावर ‘तुझंच घर समज’ असं आपल्याला सांगत आपल्याला त्या घरात जागा दिली जाते, म्हणजे एका अर्थी दोन्ही घरं आपली नाहीतच कारण दोन्हीकडे फक्त आपलं ‘समजून’ राहायचं.

लागत असेल. शिवाय 'आता तू तुझ्या घरासाठीच विचार कर. आमचा विचार करू नकोस.' हेदेखील ते किती सहजपणे सांगून जातात. बरं, तुला मात्र जेव्हा आमची गरज लागेल तेव्हा आम्ही तुझ्यासाठी आहोत, असं सांगायलाही ते विसरत नाहीत. पण मुलींची लग्नानंतर त्यांच्याबद्दलची जबाबदारी संपत नाही हेच खरं!

मला आठवतं, लहानपणी मी आईला 'मी तुम्हा दोघांना सोडून कधीच कुठेही जाणार नाही' असं सांगायचे, तसं सगळ्याच मुली म्हणतात हे मला नंतर समजलं. सोडून तर जावंच लागतं, पण निदान आपण गेल्यानंतर त्यांना काही अडणार नाही किंवा त्यांच्या अडीनडीला धावून जाता येईल एवढी तयारी तरी आपण मुलींनी ठेवणं भाग आहे.

पूर्वी जेव्हा मुली फार शिकलेल्या नसत तेव्हा सर्वच बाबतीत त्या नवऱ्यावर अवलंबून असायच्या. पण आता आपण शिकलेल्या, कमावत्या मुली आपल्या जन्मदात्यांची जबाबदारी घेताना कचरायचं काहीच काम नाही. या जबाबदाऱ्या काही नेहमी आंथिक स्वरूपाच्याच नसतात तर त्यांच्यासाठी त्यांना वाटेल त्यावेळी उपलब्ध होऊ शकणं हीदेखील केवढी मोठी जबाबदारी आहे.

परवा सहज गप्पा मारताना माझी १६ वर्षाची भाची म्हणाली, खरं तर लग्नानंतर मुलींची आई-वडिलांबद्दलची जबाबदारी संपते ना! त्यावेळी मी तिला नाही गं, असं नसतं, एवढंच म्हणाले. पण आत कुठेतरी विचारांचं चक्र सुरू झालं होतं. असं तिला का वाटलं असेल हा विचार प्रथम मनात आला. त्यावर उत्तर असं मिळालं की तिला मोठा भाऊ आहे. त्यामुळे उद्या लग्न होऊन गेल्यावर तिच्या आई-वडिलांची तो आणि त्याची पत्नी काळजी घेईल, अशी तिला आशा आहे, किंबहुना अशी तिची सरळसोट समजूत आहे, विश्वास आहे. कदाचित त्यामुळे ती निर्धास्तपणे लग्नानंतर आई-वडिलांप्रति आपली जबाबदारी संपेल असं मानतही असेल. भविष्यात ती प्रत्यक्ष तशी वागणार नाही याची मला खात्री असली तरी तिचा हा विचार तिच्या पिढीतल्या मुलींचा प्रातिनिधिक स्वरूपाचा विचार तर नसेल ना! असा विचार मनात येऊन मी अस्वस्थ झाले. कारण भाऊ असला तरी आई-वडिलांप्रति मुलीची जबाबदारी आणि ओढ कधीही कमी होत नाही असंच मला आजवर वाटत आलं आहे. कारण मुलांपेक्षा मुलीच पालकांची साथ अधिक चांगली देतात. ते म्हणतात ना की, मुलगा तोपर्यंत तुमचा असतो जोवर त्याचं लग्न होत नाही पण मुलगी मात्र अंतापर्यंत तुमची राहते.

असो, लग्नानंतर दुहेरी भूमिकेत वावरणाऱ्या स्त्रीची जबाबदारीही दुहेरी झालेली असते. त्यामुळे आपल्याला दोन हातांनी लढण्यावाचून पर्यायच नसतो. म्हणूनच आपणा मुलींचं आयुष्य ही मला कधीतरी मोठी गंमत वाटते. लग्न होईपर्यंत आई-वडील 'परक्याचं धन' म्हणून 'तुला एक दिवस तुझ्या घरी जायचंय'असं सांगत आपली जपणूक करतात, आपल्याला वाढवतात. आणि सासरी आल्यावर 'तुझंच घर समज' असं आपल्याला सांगत आपल्याला त्या घरात जागा दिली जाते, म्हणजे एका अर्थी दोन्ही घरं आपली नाहीतच कारण दोन्हीकडे फक्त आपलं 'समजून' राहायचं.

पण थोडय़ा वेगळया दृष्टिकोनातून पाहिलं तर दोन्ही घरं आणि दोन्ही घरातली माणसंही आपलीच! फरक फक्त दृष्टिकोनाचा आहे.

मी तर म्हणेन, आपण मुली याबाबतीत खूप नशीबवान आहोत, कारण एकाच आयुष्यात आपण दोन घरांवर हक्क सांगू शकतो. मुलांना ही संधी मिळत नाही. पण जसा दोन घरांवर हक्क असतो तसाच त्याच्या हातात हात घालून येणाऱ्या कर्तव्यांकडे, जबाबदाऱ्यांकडेही लक्ष असलं म्हणजे मिळवलं. या जबाबदाऱ्या पेलता यायला हव्यात. पैकी सासरी आपण राहत असल्यामुळे तिथल्या दैनंदिन जबाबदाऱ्यांची पूर्तता करणं तुलनात्मकदृष्टय़ा सोपं असतं. कारण ते आपल्या अंगवळणी पडत जातं. सवयीचं होत जातं. पण विशेषत: माहेरच्या माणसांप्रति असलेली आपली जबाबदारी आपण किती योग्यतेने पार पाडतो, हे स्त्री म्हणून आपली कुवत आणि योग्यता पारखण्याचं परिमाण ठरू शकतं.

या जबाबदाऱ्यांचं दोन्ही घरातलं स्वरूप प्रत्येकीच्या बाबतीत वेगळं असू शकतं. पण गरजेच्या वेळी दोन्ही कुटुंबांच्या सोबत ठामपणे उभं राहण्याची जबाबदारी सर्वात मोठी आहे. त्यासोबत मुलगी, सून, काकी-मामी, वाहिनी, आई, आजी अशा एक न अनेक नात्यांच्या जबाबदाऱ्या आपल्यावर पडणारच असतात. लग्नाआधी आई-वडिलांच्या छत्रछायेत खरं तर आपल्याला जबाबदाऱ्यांची जाणीव होण्याचं काही कारणच नसतं, म्हणूनच लग्न झाल्यावर मात्र त्याची प्रकर्षाने जाणीव व्हायला लागते आणि आपण मुलीही अगदी सवयीच्या असल्याप्रमाणे प्रसंगानुरूप त्या पार पाडत राहतो. कारण जबाबदाऱ्यांच्या एका अविरत चक्राची आपल्या आयुष्यात सुरुवात झालेली आहे हे आपल्याला नकळत उमगलेलं असतं.

# वडीलरूपी सासरे

*आपण अगदी पुरातन काळापासून आईचे गोडवे गाण्यात इतके मग्न झालेलो आहोत की वडिलांच्या त्यागाकडे आणि मायेकडे आपलं लक्ष वेधून घेण्यासाठी एखाद्या सलील कुलकर्णीला 'दमलेल्या बापाची कथा' आपल्याला ऐकवावी लागते. आईच्या उत्सवात जसे बाबा दुर्लक्षित राहिले तसे सासूच्या कहाण्यांमध्ये सासरे कायम उपेक्षित राहिले. आज, सुनेचा नवीन घरातील मूक आधारस्तंभ असलेल्या सासऱ्यांचं आणि मनावर कित्येक मणांचा दगड ठेवून लेकीला सासरी पाठवणाऱ्या बाबांचं मनोविश्व उलगडण्याचा छोटासा प्रयत्न करतेय.*

काही दिवसांपूर्वी आमच्या घरी एक लहानशी पूजा झाली. मी ऑफिसमध्ये होते पण माझ्या नवऱ्यासकट बाकी सगळे घरी होते. दुपारी सगळे एकत्र जेवायला बसल्यानंतर माझे सासरे म्हणाले की, आपण इथे सुग्रास जेवण जेवतोय आणि ती मात्र तिथे डब्यातली पोळी-भाजी खात असेल. लगेच सासुबाईंनी मला फोन केला आणि हे सांगितलं त्याक्षणी मला नेमकं काय वाटलं हे नक्की नाही सांगता येणार पण मी साहजिकच भारावून गेले होते. एवढ्या छोट्याशा प्रसंगातून खऱ्या अर्थी मला आणखी एक 'बाबा' मिळाल्याचा आनंद लाभला होता.

जसं मुलांचा आईकडे जास्त ओढा असतो तशी मुलींची वडिलांशी जास्त जवळीक असते हे शंभर टक्के खरंच आहे. म्हणूनच तर मुलीच्या आयुष्यातला पहिला 'सुपरहिरो' कायम तिचे वडीलच असतात. आईकडे जरी आपण मन मोकळं करत असलो तरी वडिलांना मात्र अनेकदा आपण न सांगताच आपल्या मनातलं कळलेलं असतं.

आपल्याला आयुष्यात कोणत्याही प्रकारच्या संकटांचा सामना करावा लागू नये म्हणून वडील कुठलाही आव न आणता कायम पडद्यामागच्या कलाकारासारखी भूमिका निभावत असतात. मुलांच्या यशाचं श्रेय आपण सहजपणे आईला देऊन मोकळे होतो पण वडिलांचा त्यातला वाटा सपशेल विसरून जातो, वडील मात्र श्रेयाची अपेक्षा न करता मूकपणे आपलं यश पाहून मनातून आनंदी होत असतात. घरावर संकट आलं की आई रडून मोकळी होते पण वडील त्यांच्या भावनांना शस्त्र बनवतात, आपल्या सगळयांचं बळ बनतात. कुठलीही अडचण आपल्यापर्यंत पोहोचण्याआधीच त्याचा नायनाट करण्यासाठी ते सदैव सज्ज असले तरी संकटांचा सामना करायचं कौशल्य ते आपल्यालाही शिकवायला

विसरत नाहीत. कठीणप्रसंगी तेच सर्वात मोठा आधार बनून पाठीशी उभे राहतात. याचा अनुभव आपल्या सगळयांनाच कधी न् कधी आलेला असतो.

काही दिवसांपूर्वी आम्ही ऑफिसमध्ये महिला दिनाचं जोरदार सेलिब्रेशन केलं, पण घरी परत जाताना त्याचं सगळं वर्णन बाबांनाच फोन करून सांगितलं होतं. आपण महिला दिन साजरा करतो खरा! पण पुरुषांचं आपल्या आयुष्यातलं महत्त्व आपण नाकारू शकत नाही हेच खरं! आमच्या महिला दिनाच्या कार्यक्रमाला आलेल्या तिन्ही मुख्य पाहुण्याही त्यांच्या व्यावसायिक आणि खासगी आयुष्यात त्यांच्या पतीचं योगदान किती अनमोल आहे हे सांगायला विसरल्या नाहीत. यशस्वी पुरुषामागे स्त्री खरोखरच असते का ते ठाऊक नाही पण एका यशस्वी स्त्रीमागे मात्र पुरुष खंबीरपणे उभा असावाच लागतो. मग तो पती, वडील, मित्र, भाऊ कुणीही असो. पैकी वडिलांची जागा कुणीही घेऊ शकत नाही हे निर्विवाद सत्य आहे.

बरं, एवढं असूनही आईसारखं गोड-गोड वागणं मात्र वडिलांना शक्य होत नाही. नारळा-फणसासारखे असलेले वडील वरकरणी रुक्ष आणि तापट वाटले तरी आतून त्यांच्या मनात सदैव मायेचा झरा खळाळत असतो. मुलांना मात्र मुलींच्या तुलनेत वडिलांचा धाक जास्त असतो. माझ्या सासरी आजवरच्या अनुभवांवरून तरी माझ्या नणंदेचं वडिलांशी वागणं माझ्या नवऱ्याच्या तुलनेत अधिक मोकळं आहे, असं मला कायम जाणवतं. ती जेव्हा माझ्या सासऱ्यांशी दिलखुलास बोलत असते तेव्हा मलाही नकळत बाबांची आठवण आल्याशिवाय राहत नाही. आता मीसुद्धा माझ्या सासऱ्यांशी बरीच मोकळेपणाने बोलते, गप्पा मारते. याउलट माझा नवरा वडिलांशी बोलताना सांभाळून, त्यांचा मूड पाहूनच बोलत असतो. ते मात्र त्याची कायम फिरकी घेत असतात. मला भाऊ नसल्याने माहेरी या गोष्टीचा अनुभव आला नव्हता. कारण आठवतंय तेव्हापासून वडिलांची भीती नाही तर कायम आदर आणि आधारच वाटत आला आहे. आमच्यातलं नातं खूप मोकळया स्वरूपाचं आहे. मी आणि बाबा अनेक गोष्टींवर बोलतो, भांडतो, चर्चा करतो. खरं सांगू तर आज मला जो काही स्वयंपाक करता येतो त्यातला अर्ध्याहून जास्त तर मी बाबांकडूनच शिकलेय. कारण ते स्वत: उत्तम स्वयंपाक करतात. संगीताची, जुन्या

सिनेमांची, वाचनाची, कमवलेले पैसे साठवण्याची आणि त्यांचा योग्य उपयोग करण्याची, अशा अनेक सवयी मला बाबांकडूनच मिळाल्या आहेत.

वडिलांचे जेव्हा सासरे होतात तेव्हाही त्यांची भूमिका बदलत नाही. सासूच्या बाबतीत जसं 'त्याची' आणि 'तिची' यात जमीन-आसमानाचा फरक असतो तसा सासऱ्यांच्या बाबतीत पाहायला मिळत नाही. मुलीचे वडील जेव्हा तिचं कन्यादान करताना मुलाच्या हातात तिचा हात देतात तेव्हाच कदाचित बाजूला उभे राहून विधी पाहणारे सासरे नकळत तिचं पालकत्व स्वीकारत असावेत. काही म्हणा, सासरी गेल्यावर जेव्हा अप्रिय परिस्थितीचा सामना करावा लागतो तेव्हा 'सासऱ्यांचाच आधार होता हो'असं सांगणाऱ्या बऱ्याच जणी आजूबाजूला सापडतील. अगदी महाभारतातलं उदाहरण घेतलं तरी पांडू राजा वारल्यानंतर कुंतीने देशोधडीला लागू नये म्हणून पितामह भीष्म जे तिच्या सासऱ्यासमानच होते, त्यांनीच तिला पुन्हा स्वगृही आणले आणि अखेपर्यंत आधार दिला होता.

आज मात्र सासू-सुनांच्या कुरबुरीत सर्वात जास्त वाईट अवस्था असते ती सासऱ्यांचीच; कारण कुणाची बाजू घ्यावी याचा निर्णय त्यांच्यासाठी अत्यंत कठीण ठरत असतो. तेव्हा मुत्सद्दीपणे निर्णय घेऊन सर्वांची मनं सांभाळत त्यांनाच निर्णय घ्यायचा असतो. खरं तर ही तारेवरची कसरत ते आयुष्यभर करत राहतात पण कधीही त्याचा गवगवा करत नाहीत. त्यांचं मन समजून घ्यायला आपणच कमी पडत असतो कदाचित!

सुनेला सांभाळून घेणारे आणि प्रसंगी मुलाचे कान धरणारे वडील वास्तविक मुलाला चुका करण्यापासून परावृत्त करत असतात. कारण काही वर्षांपूर्वीच लग्न, संसाराच्या निसरड्या वाटेवरून कुटुंबाला सोबत घेऊन, सावरत, सांभाळत ते इथपर्यंत पोहोचलेले असतात. आपण जर काही चुका भूतकाळात केल्या असतील तर आपल्या मुलाने त्याची पुनरावृत्ती करू नये अशी त्यांची प्रामाणिक इच्छा असते. मुलगा आईच्या कितीही जवळ असला तरी वडिलांइतकं त्याला कुणीही समजू शकत नाही. कारण सासू कधीतरी सून होती असं जेव्हा आपण म्हणतो तेव्हा वडीलही कधीतरी मुलगा होते हेही तेवढंच खरं आहे.

# पहिल्या सणांची गंमत

*लग्नानंतर वर्षभर कुठलाही सण आला की सर्वांकडून, काय मग, सासरहून काय मिळालं? अशी दोघांनाही विचारणा सुरू होते. या पहिल्या सणांची उत्सुकता आणि आनंद काही वेगळाच असतो, आयुष्यभराच्या आठवणी देणारा असतो. हे सण साजरे करताना आणि त्यांची तयारी करताना अनेक गमतीजमती घडत असतात. माझे नुकतेच काही पहिले सण साजरे झाले, याची मजा तुमच्यासोबत वाटल्याशिवाय द्विगुणीत कशी होईल?*

आपल्या संस्कृतीचा आणि वैभवशाली परंपरांचा आरसा म्हणजे आपले सण. आपल्या प्रत्येक सणामागे अनेक आख्यायिका आणि निमित्तं असतात. पण सण साजरा करण्यामागे मात्र घरातल्या, समाजातल्या सर्वांनी एकत्र येऊन सहजीवनाचा, समाजजीवनाचा अनुभव घ्यावा हा एकमेव उद्देश असतो. आपल्याकडे तर इतके मराठी सण आहेत की एक संपत नाही तर पुढच्या सणाची तयारी सुरू होते. आम्हीसुद्धा रंगपंचमी खेळून झाल्यावर लगेच संध्याकाळी गुढीपाडव्याची साडी खरेदी करण्यासाठी गेलो. सणांनी अशा भरगच्च भरलेल्या वर्षामुळे दिवस अगदी पटापट निघून जातात आणि जगणं एकसुरी, कंटाळवाणं होत नाही. अशा वेळी मला प्रश्न पडतो की फुकाचं तत्त्वज्ञान झोडत सण साजरे न करणारे लोक कसे बरं जगत असतील?

असो, मी गिरगावसारख्या मराठी माणसांचं सांस्कृतिक केंद्र म्हणवल्या जाणाऱ्या ठिकाणी जन्मले आणि लहानाची मोठी झाले. त्यामुळे सण-समारंभांकडे माझी ओढ आणि ते साजरे करण्यासाठी माझी उत्सुकता जरा जास्तच असते.

लग्नाच्या वेळी आणि लग्नानंतरही प्रचंड उत्सुकता असलेल्या अनेक गोष्टींपैकी एक म्हणजे लग्नानंतर येणारे पहिले सण! सणवार आपण अगदी लहानपणापासून नियमित साजरे करत असलो तरी लग्नानंतरचे पहिले सण काही खासच असतात. त्यातही जावयाचे वर्षाचे १२ सण हा फार मनोरंजक विषय आहे. कधी जावई या सणांसाठी रुसतो तर कधी लाजत-बुजत सासरच्या पाहुणचाराचा स्वीकार करतो. सुनेसाठीही पहिले सण म्हणजे नटण्या-मुरडण्याची आणि भेटवस्तू पदरात पाडून घेण्याची सुवर्णसंधीच असते.

आता खरं तर गुढीपाडव्यानंतर थेट वटपौर्णिमेपर्यंत सणावारांना सुट्टीच आहे पण तरी आज अचानक सणांविषयी का लिहितेय? कारण होळीच्या निमित्ताने माझा लग्नानंतरचा दुसरा आणि नाताळ धरला तर तिसरा सण साजरा झाला.

आमच्याकडे माझ्या दोन नणंदांची कुटुंबं आणि आम्ही असे एकूण बारा जणांनी सगळया लहान-मोठया गोष्टी एकत्र साजरे करण्याची पद्धत आहे. त्यामुळे प्रत्येक समारंभाचा आनंद द्विगुणीत होत असतो. पैकी माझ्या एका नणंदेचा सात वर्षाचा मुलगा, आर्यन, का कोण जाणे अगदी पहिल्या दिवसापासून माझ्याशी बोलतच नाही. त्याने माझ्याशी बोलावं यासाठी घरातली प्रत्येक व्यक्ती कायम निरनिराळया क्लृप्त्या करत असते आणि त्यातूनही अनेक गमतीजमती घडत असतात. लग्नाआधी आमचा थेट संबंध येत नव्हता, पण लग्नानंतर मात्र आम्ही जवळजवळ रोजच समोरासमोर येतो त्यामुळे आमच्यातली दरी दूर करण्यासाठी एखाद्या आइसब्रेकरची गरज होती. सण-समारंभापेक्षा अधिक कुशलतेने हे काम कोण करणार?

माझं लग्न डिसेंबरमध्ये झालं. त्या महिन्यात आपले मराठी सण काही नसतात पण आम्ही फिरून आलो त्यानंतर लगेच नाताळ होता. या संधीचा मी फायदा घेतला. लहान मुलांना, एवढंच कशाला मला अजूनही, ख्रिसमस ट्रीची प्रचंड आवड आहे. मी आदल्या दिवशी त्यासाठी लागणारं सगळं समान आणलं आणि थेट माझ्या नणंदेच्या घरी जाऊन थडकले, तिथे मी मुलांसाठी हे आणलंय त्यामुळे मुलांनी हे झाड सजवण्यासाठी मला मदत करायची आहे असं जाहीरच करून टाकलं. माझा नेम थोडाफार आर्यनच्या जवळ लागला होता. त्यामुळे निदान ख्रिसमस ट्री तयार करण्याच्या निमित्ताने तरी आमच्यात थोडाफार संवाद झाला, हेही नसे थोडके! ते झाड खरंच खूप सुंदर सजलं, मग मी ते नाताळच्या पूर्वसंध्येला तिथेच ठेवून निघून आले. दुसऱ्या दिवशी ते झाड घेऊन माझी भाचेकंपनी घरी आली आणि ते आमच्या घरात विराजमान झालं. ते झाड सगळ्यांना इतकं आवडलं होतं कीपुढे जानेवारीच्या पहिल्या आठवडयापर्यंत ते तसंच हॉलमध्ये ठेवलं होतं. खरं तर या आधी आमच्या घरी नाताळ वगैरे आणि तोही अशा पद्धतीने कुणीही साजरा केला नव्हता. पण सगळ्यांना आवडलं आणि माझ्या नवीन कुटुंबाच्या जवळ येण्याचा माझा पहिला प्रयत्न यशस्वी झाला.

त्यानंतर खऱ्या अर्थी माझा पहिला सण आला तो मकरसंक्रांतीचा! गंमत म्हणजे याच दिवशी माझा वाढदिवससुद्धा असतो आणि आदल्या दिवशीच आमच्या लग्नाला

एक महिना पूर्ण झाला होता. त्यामुळे रात्री १२ वाजताच केक कापून आम्ही दोन्ही गोष्टी साजऱ्या केल्या. सेलिब्रेट करण्यासाठी आमच्याकडे त्या दिवशी भरपूर कारणं होती. माझ्या सासर-माहेरचे, परिसरातल्या मैत्रिणी असे सगळे जमले. माझं पहिलं हळदीकुंकू, हलव्याच्या दागिन्यांची वाडी, मकरसंक्रांतीची पूजा अशी सगळी मजा होती. एवढया सगळया गडबडीतूनही थोडासा वेळ चोरून सागर मला वाढदिवसाची भेट आणण्यासाठी घेऊन गेलाच.

पहिल्या सणाची उत्सुकता आणि आनंद खरं तर दोघांसाठीही सारखाच असतो. पण खरी गंमत येते जेव्हा दोघंही नोकरी करणारे असतात आणि सुट्टयांची बोंबाबोंब असते. म्हणजे एकाला एका सणाला सुट्टी असते तर दुसऱ्याला नेमकं त्याच सणाला ऑफिसमध्ये जायचं असतं. माझ्या कामाचं स्वरूपही थोडं वेगळं असल्याने सुट्टयांची कायम मारामारी असतेच. अगदी आत्ता होळीलाही ऑफिसची संपूर्ण इमारत रिकामी असताना मी मात्र सजूनधजून ऑफिसला आले होते कारण इथून आम्हाला थेट माझ्या माहेरी जायचं होतं. दुपारी चारनंतर मुंबादेवीचं दर्शन घेऊन, माहेरचा सण करून, होळीला नारळ अर्पण करून, जेवून आम्ही रात्री जवळजवळ १२ वाजता माझ्या सासरच्या होळीला नारळ अर्पण करायला गेलो होतो. तोवर तिथे सगळयांचा खोळंबा झाला पण उत्साह मात्र तिळमात्र कमी झाला नव्हता. दुसऱ्या दिवशी सुट्टी घेता आली म्हणून सगळयांसोबत रंगपंचमी तरी छान खेळता आली.

असं पुढे प्रत्येकच सणाच्या वेळी होत राहणार, पण सुदैवाने माझ्या सासरचे माझ्या व्यावसायिक जबाबदाऱ्या समजून घेतात. प्रत्येकीच्याच वाटयाला हे येतंच असं नाही पण म्हणून मीही त्यांना प्रत्येकच वेळी गृहीत धरू शकत नाही कारण माझं कामाप्रति जसं कर्तव्य आहे तसं घराप्रतिही आहेच. पण अशी तारेवरची कसरत करूनही शेवटी सर्वांना आनंद मिळाला की सगळी धावपळ सार्थकी लागल्यासारखी वाटते.

प्रत्येक सणाच्या आठवणी वेगळया असल्या तरी पुढे कित्येक वर्ष हेच सण दरवर्षी येत राहतील. पण लग्नानंतरच्या पहिल्या सणांच्या आठवणी कपाटाच्या कोपऱ्यात ठेवलेल्या अत्तराच्या कुपीप्रमाणे मनाच्या कोपऱ्यात सदैव दरवळत राहतील, यात शंका नाही.

# यशस्वी स्त्रीची व्याख्या

*एखादी स्त्री उच्च पदावर पोहोचली की आपल्याला अभिमान वाटतो. तिला आपण यशस्वी स्त्री असं बिरुद चिकटवून टाकतो. विशेषतः लग्नानंतर आणि प्रतिकूल परिस्थितीत जर तिने हे यश संपादित केलं असेल तर त्याला वेगळं महत्त्व प्राप्त होतं. अशा स्त्रिया आपल्यासाठी आदर्शवत असतात. पण त्यांनी कोणत्या परीस्थितीत हे यश संपादित केलं आहे, विशेषतः लग्न झालेल्या स्त्रियांसाठी यशाची व्याख्या काय असते याचा थोडा उहापोह करण्याचा आज प्रयत्न करतेय.*

हल्ली या सदरातला प्रत्येक लेख लिहून झाल्यावर आता विषय संपले असं वाटतं; लग्नाशी संबंधीत आणखी किती गोष्टींवर लिहिणार? पण नेमकं त्याचवेळी काहीतरी नवीन घडतंच; त्यामुळे या विषयाला किती विविधांगी कंगोरे आहेत याचा पुन्हा पुन्हा अनुभव येतो आणि तो अनुभव तुमच्यासोबत वाटण्याची इच्छा होते.

लग्न म्हटल्यावर राजा-राणीचा संसार असं सुंदर चित्र आपल्या डोळ्यासमोर साहजिकच उभं राहतं; पण लग्न आणि संसार करणं ही एवढयावरच संपणारी गोष्ट नाही हे मला नुकतंच उमगलंय असं म्हणायला हरकत नाही. सध्या संगीता धायगुडेंचं 'हुमान' हे पुस्तक वाचतेय. स्त्रीच्या संघर्षाबाबत वाचताना प्रत्येक वेळी तिच्या ताकतीचा नव्याने प्रत्यय येत असतो. पतीच्या निधनानंतर शून्यातून सारं काही उभ्या करणाऱ्या अनेक स्त्रिया

आपल्याकडे लग्नानंतर पतीची ताकद बनून त्याला कामात साथ देऊन संसार चालवणाऱ्या कित्येक स्त्रियांची उदाहरणं आहेत; दीपा आणि सुहास अवचट, आमटे दाम्पत्य, अंबानी बंधू आणि त्यांच्या पत्नी, बिल गेट्स आणि मेलिंडा गेट्स अशी अनेक उदाहरणं देत येतील. खरंतर इतकं दूर जायचीही आवश्यकता नाही. आपल्या गल्लीतल्या भाजीवाल्याच्या किंवा वडापाव विकणाऱ्याच्यासोबत नाही का त्याची पत्नी खांद्याला खांदा लावून दिवसभर झटत असते.

आपण आपल्या आजूबाजूला पाहतो. काहींच्या कहाण्या प्रसिद्ध होतात तर काहींचा संघर्ष कायम अंधारातच राहतो. पैकी संगीता धायगुडेंनी शिक्षणाची कास धरली आणि नव्हत्याचं होतं केलं. पतीच्या निधनानंतर दोन मुलं पदरात असताना कमावतं होण्यावाचून पर्याय नसल्यामुळे त्यांनी त्या परिस्थितीत शिक्षण पूर्ण केलं, एवढंच नाही तर आज त्या मोठया सरकारी पदावर कार्यरत आहेत. आपणा स्त्रियांचं हे रूप मला प्रचंड भावतं. काही महिन्यांपूर्वी नीला सत्यनारायण ह्या महाराष्ट्राच्या पहिल्या निवडणूक आयुक्त असलेल्या कर्तुत्ववान स्त्रीच्या संघर्षाविषयी वाचत होते. त्यांच्या 'एक पूर्ण अपूर्ण' या पुस्तकात जन्मतः 'ऑटीझम' हा आजार असलेल्या आपल्या मुलाचं सर्वसाधारण मुलांप्रमाणे संगोपन करण्यासाठी त्यांच्यातल्या आईची झालेली धडपड त्यांनी मांडली आहे. काही वर्षांपूर्वी म्हणजे लक्ष्मीकांत बेर्डेंच्या निधनानंतर काही महिन्यांनी एका मित्रासोबत काही कामानिमित्त त्यांच्या घरी जाण्याचा योग आला होता. लक्ष्मीकांत असेपर्यंत काम जवळजवळ बंद केलेल्या प्रिया बेर्डेच्या पदरात दोन लहानगी मुलं होती. बोलता-बोलता ती 'आता मुलांसाठी उभं रहायला हवं' असं म्हणाली आणि काही महिन्यांतच 'जत्रा' सिनेमातून तिने अभिनयक्षेत्रात पुन:पदार्पण केलं. नंतर असं समजलं की मुलांना शिक्षणासाठी तिने कुठेतरी पाठवलं आहे, ज्यामुळे तिला इथे व्यवस्थित काम करता येईल, पक्कं खरंच माहित नाही. पण अशा हृदयस्पर्शी कहाण्या वाचून आपल्याला या स्त्रियांबद्दल सहानुभूती वाटत नाही तर आदर वाटतो आणि आत्मविश्वास बळावतो.

नवऱ्यावर अवलंबून राहण्याचे किंबहुना त्याने एकटयाने कमवायचं आणि इतरांनी बसून खायचं हे दिवस आता राहिले नाहीत. नोकरी करणाऱ्या स्त्रियांचं जरी आता अप्रूप राहिलेलं नसलं तरी घर आणि काम या दोन्ही गोष्टी कोण किती योग्य पद्धतीने हाताळतं याला महत्त्व आहे. आपल्याकडे लग्नानंतर पतीची ताकद बनून त्याला कामात साथ देऊन संसार चालवणाऱ्या कित्येक स्त्रियांची उदाहरणं आहेत; दीपा आणि सुहास अवचट, आमटे दाम्पत्य, अंबानी बंधू आणि त्यांच्या पत्नी, बिल गेट्स आणि मेलिंडा गेट्स अशी अनेक उदाहरणं देत येतील. खरंतर इतकं दूर जायचीही आवश्यकता नाही. आपल्या गल्लीतल्या

भाजीवाल्याच्या किंवा वडापाव विकणाऱ्याच्यासोबत नाही का त्याची पत्नी खांद्याला खांदा लावून दिवसभर झटत असते. नवऱ्याच्या मिळकतीला हातभार लावण्याच्या हेतूने आपल्या काळजाचा तुकडा असलेल्या लेकराला पाळणाघरात परक्यांच्या स्वाधीन करून त्याच्याच उज्ज्वल भवितव्यासाठी अहोरात्र मेहनत करणाऱ्या किती किती स्त्रिया आपल्या भोवताली आहेत, आपल्या घरी काम करायला येणारी कामवालीच पहा ना! माझ्यासाठी तर याच सगळ्या खऱ्या नायिका आहेत.

माझी एक मैत्रीण कॉलेजमध्ये असताना नेहमी म्हणायची मी लग्न करणार नाही, मी खूप मोठी कुणीतरी होणार, खूप पैसे कमावणार आणि यशस्वी होणार. तिच्या या नेमक्या शेवटच्या शब्दांवर माझा कायम आक्षेप असायचा. निव्वळ पैसा कमावणं किंवा नोकरी-व्यवसायात मोठया हुद्यांवर काम करणं म्हणजे यशस्वी होणं कसं असू शकेल? बरं, यशाची व्याख्या जरी प्रत्येकाची वेगळी असली तरी यशस्वी कुणाला म्हणायचं याचे काही ठोकताळे, निष्कर्ष असू शकतात.

कमावणं हा मुद्दा नाहीये तर स्वत्व टिकवणं जास्त महत्वाचं आहे. २४ तास घर आणि मुलं सांभाळणारी स्त्री म्हणजे उत्तम स्त्री असंही म्हणता येणार नाही. माझी नणंद खरं तर खूप शिकली आहे पण लग्नानंतर घर, मुलं या पसाऱ्यात ती इतकी अडकून गेली आहे की मनात असूनही ती स्वतः साठी काही करू शकत नाहिए. पैसे कमावणं हा उद्देश नसला तरी स्वतःचं शिक्षण आणि कौशल्य कुठेतरी कामी यावं म्हणून आता तिची धडपड सुरु झाली आहे. तिला काहीतरी करावसं वाटतंय हेच सर्वात महत्त्वाचं आहे कारण इच्छाशक्तीमुळेच पुढचे मार्ग उघडत जातील. याउलट लग्नाच्या वेळी कामाचा, नोकरीचा गंधही नसलेली माझी आत्या आज पुण्यात नवऱ्याच्या व्यवसायात पूर्णपणे गुंतून, घर-मुलं सगळं सांभाळून त्यांना कामात फार मदत करते आहे. म्हणूनच मला वाटतं की माझ्या नणंदेसारख्या सर्व बाजूंनी अडकलेल्या स्त्रियांनी माझ्या आत्यासारख्या स्त्रियांचा आदर्श समोर ठेवायला काहीच हरकत नाही.

काही दिवसांपूर्वी आमच्या ऑफिसमध्ये एका मोठया वृत्तपत्राच्या संपादिका आल्या होत्या. एक स्त्री एवढया मोठया हुद्यावर, इतकं जबाबदारीचं काम करतेय, म्हणून खरंतर आम्हाला त्यांचा अभिमान वाटत होता पण राहून राहून माझ्या मनात एक गोष्ट खटकत होती. चाळीशीतल्या त्या कर्तबगार स्त्रीनं लग्न केलं नाहीए. लग्न केलं असतं तर हे यश कधीच मिळवता आलं नसतं असं त्याच मागे एका मुलाखतीत म्हणाल्या होत्या. त्यांच्या क्षेत्रात अव्वल स्थानावर काम करणाऱ्या त्यांना मी यशस्वी संपादिका म्हणेन पण सोयीस्कररित्या संसारिक जबाबदाऱ्या नाकारून केवळ व्यावसायिकदृष्टया यशस्वी वाटचाल करणाऱ्यांना 'यशस्वी स्त्री' असं संबोधणं खरंच योग्य आहे का? असा मला प्रश्न पडतो. त्यापेक्षा सकाळी चारला उठून घरातल्या सगळयांचे डबे तयार करून बदलापूरहून चेंबूरच्या शाळेत सकाळी सात वाजता शिकवायला येणाऱ्या माझ्या एका मैत्रिणीच्या आईला, ज्यांनी असे कष्ट घेऊन आपल्या दोन्ही मुलांना उत्तम शिक्षण देऊन आपल्या पायांवर उभं केलं, त्या माझ्यासाठी जास्त योग्य आदर्श वाटतात.

संसार आणि काम यांचा उत्तम समन्वय साधणारी स्त्रीच यशस्वी स्त्री म्हटली पाहिजे. कुठल्या हुद्यावर आणि किती मिळकत यापेक्षाही कोणत्या परिस्थितीत ती उभी राहते आणि न डगमगता पुढे जात राहते, हे अधिक महत्त्वाचं, नाही का!

लग्नाळू किंवा लग्न झालेल्या मुलींसमोर सत्यवानाची सावित्री, शंकराची पार्वती आणि विष्णूची लक्ष्मी यांच्यासोबत अशी उदाहरणं, हे आदर्श ठेवले तर त्या निश्चितच अधिक चांगली गृहिणी, माता आणि त्याहून महत्त्वाचं म्हणजे एक 'चांगली स्त्री' होऊ शकतील, यात शंका नाही.

# पिढयांमधील अंतर

*दोन पिढयांमधलं अंतर आणि कोण कोणापेक्षा अधिक श्रेष्ठ आहे हा वाद खूप जुना आहे. पारंपरिक आहे असं म्हटलं तरी चालेल. पण गेल्या तीन-चार दशकांमध्ये आपल्या समाजरचनेत आणि समाजाच्या विचारसरणीत आमूलाग्र बदल झाले आहेत. या बदलांमधून गेलेली आमच्या आधीची पिढी आणि त्याचदरम्यान उभारणी झालेली आमची पिढी यांच्यात मतभेद जरूर आहेत. पण कितीही मतभेद असले तरी त्या पिढीचा संघर्ष पाहिलेली, अनुभवलेली आणि त्याची जाणीव असलेली आमची ही एकमेव पिढी आहे यात शंकाच नाही.*

'पेरेन्टहूड' या इंग्रजी सिनेमातल्या मुख्य पात्राच्या भूमिकेत असलेला पीटर क्राऊस म्हणतो की पेरेन्टहूड-पालकत्व म्हणजे पुढच्या पिढीला मार्गदर्शन करणं आणि मागच्या पिढीच्या चुका माफ करणं! हे विधान कुठल्याही देशातल्या कुठल्याही पिढीसाठी अगदी समर्पक आहे. नवी पिढी निर्माण करत असताना एका पिढीतून दुसऱ्या पिढीकडे समाजाचा प्रवास सुरू होत असताना मागचं मागे ठेवून पुढे पाहण्याची आणि त्याचसोबत आपल्या अनुभवांमधून पुढच्या पिढीला सजग करण्याची मोठी जबाबदारी विद्यमान पिढीवर येते. ही जबाबदारी उमगायला अनेकदा थोडा वेळ लागतो आणि तेव्हा सुरू होतं दोन पिढयांमधलं द्वंद्वयुद्ध! दोन पिढयांमधली तफावत ज्याला आपण सहजपणे 'जनरेशन गॅप'म्हणतो तीच घरातल्या कौटुंबिक स्वास्थ्याचा (किंवा अस्वास्थ्याचा ) पाया आहे असं म्हणायला हरकत नाही. म्हणजे वडील-मुलगा, आई-मुलगी आणि अगदी सासू-सुनेच्या नात्यावरही या तफावतीचा सर्वाधिक परिणाम पाहायला मिळतो. या दोन पिढयांमधले मतभेद आणि वाद सहसा या जनरेशन गॅपमुळेच उद्भवत असतात.

मी म्हणेन, आता माझ्या आधीची पिढी आणि आमच्या पिढीत प्रचंड तफावत आहे. पण कदाचित असं प्रत्येकच पिढीला वाटत असेल. आधीच्या पिढीचे सिनेमे, कपडयांच्या पद्धती, सणवार साजरे करण्याच्या पद्धती, आनंद-दु:ख व्यक्त करण्याच्या पद्धती, देव, श्रद्धा, खाण्या-पिण्याच्या सवयी, भाषा, संगीत, साहित्य, खेळ, अभ्यास, पर्यटन, आर्थिक गणितं, सगळं सगळंच पुढच्या पिढीकडे जाईपर्यंत पूर्णपणे बदलून गेलेलं असतं. जे हा बदल स्वीकारू शकत नाहीत ते स्वत: कायम अडकून राहतात आणि पुढे जाणाऱ्यालाही मागे खेचत राहतात.

आमच्या घरात सात ते साठ दरम्यानच्या प्रत्येक वयोगटातली माणसं आहेत. हे ज्या वेळी माझ्या लक्षात आलं तेव्हा मला फार गंमत वाटली. मग मी त्यांच्या बोलण्याकडे, वागण्याकडे आणि अर्थात विचार करण्याच्या पद्धतीकडे थोडं बारकाईने पाहू लागले. त्यातही मजा अशी असते की सर्वात लहान पिढीचं वयाने सर्वात मोठया असलेल्या पिढीशी जास्त चांगलं जमतं. कारण त्यांच्या विचारांवर आणि कृतींवर या दोन्ही पिढया ठाम असतात. मधल्या सर्व पिढया मात्र ना इथले ना तिथले म्हणून कधी आर तर कधी पार असा खेळ खेळत राहतात.

म्हणजे सर्वात मोठी पिढी असलेली घरातली मोठी माणसं आम्हाला जे काही सांगतात त्यावर फार वाद-विवाद न करता मोठयांची आज्ञा म्हणून आम्ही निमूटपणे पाळत असतो आणि त्याच वेळी काळासोबत धावताना आणि लहानांच्या पिढीला मागासलेले वाटू नये म्हणून आधुनिकतेची कास धरण्याचीही आमची सतत धडपड सुरू असते. सर्वात लहान असलेली पिढी मात्र 'आम्ही हे करणार नाही किंवा हेच करणार' असं ठामपणे सांगून विषय संपवून मोकळी झालेली असते. मोठेदेखील ती 'नवीन पिढी आहे, ती अशीच वागणार' म्हणून सोडून देतात पण अनेकदा त्यांच्या आणि छोटयांच्या पिढीदरम्यान एक पिढी आमचीही आहे आणि आमच्या पिढीचीही काही तत्त्व आणि मर्यादा असू शकतात हे त्यांच्या लक्षातच येत नाही. त्याचप्रमाणे त्यांच्या बोलण्याला किंवा सूचनांना अनुभवाचं पाठबळ आहे हे आमच्याही लक्षात यायला अनेकदा वेळ लागतो.

बरेचदा ते त्यांच्या जागी आणि आम्ही आमच्या जागी योग्यच असतो. गरज असते ती फक्त दोघांनीही आपापल्या पिढीच्या कुंपणांचे काटेरी वेल अलगद बाजूला सारून दुसऱ्याच्या कुंपणात डोकावण्याची! प्रत्येक पिढीचा स्वत:चा संघर्ष असतोच. मग तो कुठल्याही प्रकारचा असू शकतो. स्थैर्य आणि अस्तित्वासाठी आमच्या आधीच्या पिढीला म्हणजेच माझ्या आई आणि सासूच्या पिढीला जेवढा संघर्ष करावा लागला तेवढा आम्हाला कदाचित करावा लागत नाही, लागणार नाही. कारण ही पिढी त्या काळातली आहे जेव्हा समाजरचनेत आमूलाग्र बदल घडत होते, औद्योगिक क्रांती होत होती, महागाई वाढत होती. पूर्वीच्या २०-२५ जणांच्या एकत्र कुटुंबाच्या गोतावळयातून बाहेर पडून आपली विभक्त कुटुंबं चालवण्याची पद्धत हळूहळू मान वर काढत होती. हे सगळं त्या काळी अगदी नवीन असल्यामुळे नवं घर शोधण्यापासून, घरच्यांचा रोष पत्करण्यापर्यंत सारं काही त्यांना सहन करावं लागत होतं. पण तेव्हा जर त्यांनी ते सहन केलं नसतं तर कदाचित आज आमची पिढी वेगळ्या पार्श्वभूमीवर तयार झालेली असती. विभक्त कुटुंब पद्धतीत वाढल्यामुळे आमच्या

पिढीत अधिक मोकळेपणा आला. आपल्या आधीच्या पिढीने खऱ्याअर्थी कोणती चळवळ पुकारून आपल्याला हे 'स्वातंत्र्य' मिळवून दिलंय याची जाणीव आमच्या पिढीला थोडया अधिक प्रमाणात आहे तरी आमच्या पुढच्या पिढीला ती असेलच हे नक्की सांगता येत नाही. कारण त्यांच्यापुढे आणखी वेगळी आव्हानं वाढून ठेवलेली असतील. आताची पिढी अधिक शिकलेली आणि व्यावसायिकदृष्टया सक्षम आहे.

मुळात शिक्षण असल्यामुळे कुठल्याही परिस्थितीत कमावता येण्याची शक्यता आहे. आता अगदी वेगळा संसार थाटायची वेळ आलीच तरी हल्ली नवरा-बायको दोघंही कमावती असतात. गृहकर्जाच्या हजारो योजना दिमतीला उभ्या असतात. पूर्वी शिक्षणच जेमतेम असायचं कारण शिक्षणाचं महत्त्व लक्षात आलेलं नव्हतं. त्यामुळे पुढचा प्रवास अधिक खडतर होत असे. आमच्या वयात जेव्हा त्यांना कुटुंबापासून वेगळं होऊन कुठे राहायचं असे प्रश्न पडत होते, त्याच वयात आज आम्ही घराच्या हॉलमध्ये एसी कोणत्या कंपनीचा लावायचा हा विचार करत असतो. कारण आमचा घराचा प्रश्न त्यांनी एक पिढी आधीच सोडवून ठेवलेला असतो. आम्ही अधिक शिकलेले आणि अधिक कमावते म्हणून अधिक यशस्वी असं म्हणता येईल का? तर नाही. खऱ्याअर्थी यशस्वी ती पिढी आहे ज्यांनी समाजात विभक्त कुटुंब पद्धतीचा यशस्वी पायंडा पाडला, ज्यामुळे अनेक कुटुंबांचं आयुष्य सुखकर झालं. सुरुवातीचे काही दिवस संघर्ष केल्यानंतर आज मिळणारा मोकळेपणा आणि स्वातंत्र्य प्रत्येकालाच हवंहवंसं आहे. प्रत्येकच गोष्टीला दोन बाजू असतात त्याप्रमाणे विभक्त कुटुंब पद्धतीलाही चांगली आणि वाईट अशा दोन्ही बाजू आहेतच. एकत्र कुटुंबात अडी-नडीला नातेवाईक धावून येऊ शकत होते असा जर कुणी युक्तिवाद केला तर आताही मोबाइलच्या एका रिंगवर किंवा एखाद्या मेसेजवर हे सहज शक्य आहेच. शेवटी एकत्र राहून मनाने दूर राहण्यापेक्षा दूर राहून मनाने जवळ राहणं कधीही योग्य आणि सगळयांच्याच सोयीचं असतं हे त्यांना पटलं म्हणून आमची पिढी एक पाऊल पुढे जाऊन इतर आव्हानांना तोंड देण्यासाठी सज्ज झाली.

भविष्यात आणखी मोठी आव्हानं असतील त्या वेळी या मागच्या पिढीचे अनुभवच कामी येतील आणि या आव्हानांतून आम्ही कमावलेले अनुभव आमच्या पुढच्या पिढीला उपयोगी ठरतील. हे चक्र अविरत चालत राहणार. गरज आहे ती फक्त प्रत्येक पिढीचा, त्यांच्या विचारांचा आदर करण्याची आणि काळासोबत सतत पुढेच चालत राहण्याची!

# पहिलं भांडण प्रेमाचं

*आपलं घरात कुणाशी भांडण झाल्यावर असं सांगण्यात येतं की आपण त्याच्याशीच भांडतो ज्याच्यावर आपलं खूप प्रेम असतं. हे बऱ्याच अंशी खरंही आहे. आपल्या आई-वडिलांशी, भावंडांशी नाही का आपण अगदी हक्काने भांडतो. लग्नानंतरच्या भांडणांची मात्र मजाच काही और असते. कधी सासू-सुनेमधलं आंबट-तिखट भांडण तर कधी नवरा-बायकोचं गोड भांडण, आमचंही लग्नानंतरचं अगदी पहिलं-वहिलं भांडण परवा झालं, हा अनुभव तुमच्यासोबत वाटल्याशिवाय पूर्णच होऊ शकत नाही.*

माझ्या लग्नानंतर दोन-एक महिने झाले असतील जेव्हा माझ्या एका सरांनी चौकशी करण्यासाठी मला फोन केला. गप्पांच्या ओघात त्यांनी मला विचारलं, 'काय मग, भांडलात की नाही अजून?' त्यावर मी 'अजिबात नाही, आम्ही मुळीच भांडत नाही' असं उत्तर दिलं. पण माझ्या बोलण्यातला अभिमान त्यांच्या पुढच्या वाक्याने पार पुसला गेला. 'मग कसले तुम्ही नवरा-बायको, भांडण झाल्याशिवाय संसाराला सुरुवात होत नाही. तुमचं जेव्हा कधी पहिलं भांडण होईल तेव्हा फोन केला नाहीस तरी चालेल पण माझी आठवण नक्की काढ' आणि काय गंमत आहे आमचं खरंच भांडण झाल्यानंतर मला सगळ्यात आधी त्यांचे हे शब्द आठवले आणि नकळत आता माझा संसार खऱ्या अर्थी सुरू झाला या भावनेने मी मनोमन खूश झाले.

असे आपण आई-वडील, भावंडं, मित्र-मैत्रिणींशी किती वेळा आणि कित्येक विषयांवरून भांडत असतो. पण लग्नानंतर नवऱ्यासोबत होणाऱ्या भांडणाला खास महत्त्व आहेच. आमच्यातला वाद अगदी आजच्या पिढीला शोभेल असा 'व्हॉट्सअॅप'वर चॅट करताना सुरू झाला आणि संध्याकाळी ऑफिसमधून घरी परत आल्यावर

लग्नानंतर सहा-आठ महिने घरात वडीलधारी माणसं आहेत म्हणून त्याने तिला घालून दिलेली दिसण्या-नेसण्याची, वागण्याची सारी बंधनं तिने निमुटपणे पाळली पण पुढे याचा आग्रह वाढतच गेल्याने अखेर तिने बंडखोरीचं अस्त्र बाहेर काढलं आणि 'आता मी मला वाटेल तसंच वागणार'असं जाहीर करून ती मोकळी झाली. आता मात्र माझ्या या मित्राची फारच पंचाईत झाली आहे. कारण तिच्या अशा पवित्र्याने जराही विरोध केला तरी घरात वितंड-वाद होण्याचीच शंभर टक्के खात्री असते.

प्रत्यक्ष शाब्दिक लढाईला सुरुवात झाली. अखेर आई-बाबांनी मधे पडून त्याला पूर्णविराम लावला. यात गंमत अशी होती की, आम्ही मुळी एखाद्या विशिष्ट विषयावर किंवा मतभेदांमुळे भांडतच नव्हतो तर आमचं एकमेकांवर किती प्रेम आहे, किती काळजी आहे आणि आम्ही जे काही करतोय ते त्याच प्रेमापोटी हेच एकमेकांना रागाने आणि आवाज चढवून सांगत होतो. आम्ही तेव्हा तसे का वागत होतो हे खरंच आम्हालाही समजलं नाही. दुसऱ्या दिवशी आम्ही याच गोष्टीवर खूप हसलो, मस्त शॉपिंग करायला गेलो, बाहेर जेवायला गेलो. पण आमच्या भांडणाच्या त्या तेवढया वेळापुरती मात्र घरातल्या सगळयांचीच घाबरगुंडी उडाली होती.

नवरा-बायकोच्या संसाराला भांडणाशिवाय गोडी नाही, असं म्हणतात ते अगदी खरं आहे. भांडणाने प्रेम वाढतं असंही म्हणतात, ते कितपत खरं आहे ते सांगता येत नाही. पण भांडण होताना दोघांच्याही मनात काही काळ साचलेलं, खटकणारं, कधी मुद्दाम दडवून ठेवलेलं सगळं बाहेर येतं आणि मनं मोकळी होतात हे नक्की! अर्थात शांतपणे बसून, संवाद साधूनही अनेक गोष्टी सोडवता येतातच पण कदाचित सगळयाच नाही. अशा न बोललेल्या, साचलेल्या गोष्टी रागाच्या, भांडणाच्या किंवा वाद-विवादांच्या वेळी शब्दांद्वारे आपली वाट मोकळी करून घेत असतात. काळजी फक्त घ्यायची असते ती बेभान न होण्याची! कारण तोंडातून निघालेला एक चुकीचा शब्दही संपूर्ण वातावरण दूषित करण्यास कारणीभूत ठरू शकतो.

माझ्या निरीक्षणाप्रमाणे आणि इतरांच्या ऐकलेल्या अनुभवांप्रमाणे लग्नानंतरच्या पहिल्या वर्षात नवरा-बायकोमध्ये होणाऱ्या भांडणांसाठी काही विशिष्ट गोष्टी, विशिष्ट परिस्थिती कारणीभूत असते, असं माझ्या लक्षात येत आहे. सुरुवातीच्या काही महिन्यांत 'ट्रायल अँड एरर' बेसिसवरच एकमेकांशी वागणं चालू असतं, असं म्हटलं तरी वावगं ठरणार नाही. कारण एकमेकांच्या स्वभावाची, काय बोललं तर, कसं वागलं तर आवडतं किंवा आवडत नाही याची पुरती कल्पना नसते. ती अनुभवांमधूनच येते. अगदी प्रेमविवाहांमध्येही असंच होत असावं कारण लग्नाआधी एकमेकांना कितीही चांगलं ओळखत असण्याचा दावा केला तरी लग्नानंतर परिस्थिती सोबतच इतर अनेक गोष्टीही बदलतात. या अनेक गोष्टींमध्ये पोशाखापासून राहणीमानापर्यंत आणि भाषेपासून आवडी-निवडीपर्यंत सगळंच आलं. हे बदल दोघांनीही स्वीकारण्यासाठी थोडा वेळ जावाचं लागतो. पण याच दरम्यान मतभेद होण्याची, बंडखोरी होण्याची सर्वात जास्त शक्यता असते.

माझ्या एका मित्राचा अगदी ताजा किस्सा आहे. नुकतंच त्याच्या प्रेमविवाहाला एक वर्ष पूर्ण झालं म्हणून शुभेच्छा देण्यासाठी मी त्याला फोन केला तर तो मला एकदम त्याची 'दुखभरी दास्तान'च ऐकवू लागला. म्हणे आमच्यात हल्ली वरचेवर खटके उडतात वगैरे. मला त्याचा आग्रही आणि काहीसा चिडखोर स्वभाव माहीत असल्याने कारणांची कल्पना आलीच. पण त्याच्या बोलण्यावरून त्याच्या बायकोचा स्वभावही त्यांच्यासारखाच असावा असं वाटलं. लग्नानंतर सहा-आठ महिने घरात वडीलधारी माणसं आहेत म्हणून त्याने तिला घालून दिलेली दिसण्या-नेसण्याची, वागण्याची सारी बंधनं तिने निमुटपणे पाळली पण पुढे याचा आग्रह वाढतच गेल्याने अखेर तिने बंडखोरीचं अस्त्र बाहेर काढलं आणि 'आता मी मला वाटेल तसंच वागणार'असं जाहीर करून ती मोकळी झाली. आता मात्र माझ्या या मित्राची फारच पंचाईत झाली आहे. कारण तिच्या अशा पवित्र्याने जराही विरोध केला तरी घरात वितंड-वाद होण्याचीच शंभर टक्के खात्री असते. त्यामुळे तो बिचारा आता गप्पच झाला आहे.

याउलट, माझ्या जुन्या ऑफिसमधल्या एक सहकाऱ्याचं दोन वर्षापूर्वी लग्न झाल्यानंतर त्याच्या बायकोने त्याच्या सगळया मित्र-मैत्रिणींपासून त्याला जणू तोडूनच टाकलं. अगदी त्याने फार काळ फोनवर बोललेलं किंवा चॅट केलेलंही हिला अजिबात आवडायचं नाही. माझ्या या सहकाऱ्याचा मित्र-मैत्रिणींचा खूप जुना गोतावळा असल्याने त्यांना प्रत्येक वेळी टाळणं त्याला अशक्य होत नाही आणि बायको पाठवत नाही असं कोणता पुरुष मित्रांना सांगेल! त्याची पुरती कोंडी झाली होती. अखेर त्यानेही थोडा पवित्रा बदलला आणि आता तो तिच्या नकळतच त्यांना भेटतो आणि ती काही म्हणालीच तर त्याकडे सपशेल दुर्लक्ष करतो. 'ताणलं की तुटतं आणि अति दाबून ठेवलं की उसळून वर येतं' ही सूत्री म्हणूनच लक्षात ठेवण्याजोगी आहे. मला वाटतं, एकमेकांच्या काही छोटया-मोठया गोष्टींकडे जाणूनबुजून दुर्लक्ष करणं आणि परस्परांच्या व्यक्तिस्वातंत्र्याचा आदर करणं सर्वात महत्त्वाचं आहे. आमच्यातलं छोटेखानी भांडण शांत बसून चर्चा केल्यावरच सुटलं, त्यामुळे संवादाला पर्याय नाही हे नक्की पण हा संवाद योग्य वेळेत आणि योग्य वेळी व्हायला हवा. बाकी नवरा-बायकोच्या गोड नात्याला भांडणांचा कडू-तिखट-आंबट स्पर्श हवाच. संसाराची लज्जत वाढवण्यासाठी माझ्या सरांसारखे काही अनुभवी खेळाडू 'भांडा सौख्यभरे'असा आशीर्वाद देतात तो चांगल्या अर्थी सुफळ होवो!

# पाठीशी उभं राहणारं कुटुंब

*आपण व्यक्ती म्हणून कितीही सक्षम असलो तरी कसोटीच्या वेळी आपल्याला आधाराची आवश्यकता असतेच. हा आधार कधी मित्र-मैत्रिणींकडून मिळतो तर कधी कुटुंबाकडून! आव्हानात्मक परिस्थितीत जे आपल्या पाठीशी उभे राहतात तेच आपले खरे हितचिंतक, असं आजवर ऐकलं होतं. अशाच एका प्रसंगाने माझा यावरचा विश्वास दृढ झाला. विशेषत: सासरची माणसं जेव्हा आपल्या महत्त्वाच्या प्रसंगी आपला सगळ्यात मोठा आधार बनतात तेव्हा नात्यांचं महत्त्व द्विगुणित होतं.*

माणसांची पारख कठीण प्रसंगीच होते, असं म्हटलं जातं. याचा प्रत्यय मला नुकताच प्रत्यक्ष आयुष्यात आला आणि हा अनुभव मला काही प्रमाणात अचंबितही करून गेला. सगळं छान, सुरळीत सुरू असताना प्रत्येक जण तुमच्यासोबत असतोच, पण संघर्षाच्या वेळी जे पाठीशी उभे राहतात त्यांनाच कुटुंब म्हणणं योग्य आहे. मी या सदरात माझ्या सासरच्या माणसांबद्दल जेव्हा भरभरून चांगलं लिहिते तेव्हा अनेक जण मला विचारतात की खरंच असं आहे की तू काल्पनिक लिहितेस? मला यावर खरंच हसू येतं. चांगलं सासर असणं ही आपल्याकडे काल्पनिक गोष्ट आहे, या विचाराचंच मला नवल वाटतं. ही बाब काल्पनिक नसली तरी दुर्मिळ नक्कीच आहे. एखाद्या मुलीला सासरच्या लोकांनी पाठिंबा दिल्यामुळे ती पुढे बरंच काही करू शकली, याच्या अनेक कहाण्या मी ऐकल्या आहेत. माझी कहाणीही पुढे जाऊन कदाचित तशीच झाली तर मला मुळीच आश्चर्य वाटणार नाही.

लग्नानंतरचे चार महिने सुरळीत गेल्यानंतर अचानक माझ्यासमोर दोन आव्हानात्मक घटना येऊन उभ्या ठाकल्या. पैकी एकाला मी स्वत: निमंत्रण दिलं होतं तर दुसरी अगदी अनपेक्षित होती. तसे अचानक उद्भवलेले संघर्षाचे प्रसंग यापूर्वीही अनेक आले पण यावेळी परिस्थिती वेगळी होती. सहज एका वैद्यकीय चाचणीसाठी गिरगावहून माझ्याकडे मुलुंडला आलेल्या माझ्या आईला काही कारणास्तव अचानक हॉस्पिटलमध्ये भरतीच करावं लागलं आणि प्रकरण इतकं वाढलं की चार दिवस ती हॉस्पिटलमध्येच होती. तिला दाखल करताना मी आणि सागर दोघंही ऑफिसमध्ये होतो तेव्हा माझ्या सासरच्या सगळ्या माणसांनी एकत्र येऊन बाबांना पुढच्या सगळ्या गोष्टींमध्ये मदत केली. त्यानंतरही आई-बाबांच्या राहण्याची, जेवणाची एवढंच काय तर आरामाचीही काळजी ते इतक्या सहजपणे घेऊ लागले. जणू हे ऋणानुबंध वर्षोन वर्षाचे आहेत. एका वर्षापूर्वीपर्यंत ही सगळी

कुटुंबं एकमेकांना ओळखतही नव्हती यावर कुणाचा जराही विश्वास बसणार नाही. या सगळ्या परिस्थितीत आमची खरी कसोटी तेव्हा लागली जेव्हा माझ्या सासू-सासऱ्यांना पूर्वनियोजित कारणामुळे आम्हाला या परिस्थितीत सोडून दोन दिवसांसाठी पुण्याला जावं लागलं. होय, नाही करत ते अखेरीस मनावर दगड ठेवून निघाले कारण आम्ही दोघांनी त्यांना सगळं सांभाळून घेऊ, असा विश्वास दिला. प्रत्यक्षात मात्र आमची खूपच तारांबळ उडाली. त्यावेळी माझ्या दोन्ही नणंदा आणि त्यांची कुटुंबं आमच्या मदतीला धावून आली आणि आमचा निभाव लागला. खरं तर या आधीही अशी परिस्थिती आमच्यावर अनेकदा आली आहे, तेव्हा तर आमचा चौघांचाच परिवार असल्याने कसंबसं अशा परिस्थितीतून आम्ही पार पडत होतो. यावेळी मात्र १०-१२ जणांचं संपूर्ण कुटुंब आमच्या पाठीशी उभं राहिल्याने खूपच मोठा दिलासा मिळाला.

चार दिवसांनंतर सगळे रिपोर्ट्स नॉर्मल येऊन आईला डिस्चार्जही मिळाला पण या संपूर्ण घडामोडीमुळे मला आणि सागरला आमच्या जबाबदाऱ्यांचं एक वेगळंच भान आलं एवढं नक्की! एरव्ही आपल्याच मस्तीत नव्या नवलाईचे दिवस एंजॉय करत हिंडणारं आम्हा दोघांचं विमान या प्रसंगामुळे अक्षरश: परत जमिनीवर आलं असं म्हणायला हरकत नाही. आपल्या आजूबाजूला केवढी माणसं आहेत, आपल्यावर किती जणांची जबाबदारी आहे आणि किती लोक आपली जबाबदारी घेण्यासाठी तत्पर आहेत याचा नव्याने उलगडा झाला. भविष्यात येणाऱ्या कोणत्याही संघर्षाचा आम्ही एकत्रितपणे सामना करू शकतो याची आम्हाला खात्री पटली. आमचा एकमेकांवरचा विश्वास निश्चितच त्यामुळे द्विगुणित झाला.

दुसरं म्हणजे मी ओढवून घेतलेल्या प्रसंगाने मला माझ्या कुटुंबाची जणू नव्याने ओळख करून दिली. सध्या मला नोकरी आणि कामाच्या वेळापत्रकानुसार माझ्या घरातल्या माणसांना भरपूर वेळ देता येतो हे खरं पण करिअरमध्ये पुढं जाण्याची संधी समोरून चालून आली आणि माझ्या निर्णयक्षमतेचा अक्षरश: कस लागला. या नवीन कामामुळे माझा अधिक वेळ कामात आणि खूप थोडा वेळ घरी देण्यासाठी वाचणार होता, त्यामुळे ते मी करावं की नाही याबद्दल मनाची द्विधा मन:स्थिती झाली. सागरचंही मत काही याबद्दल अनुकूल नव्हतं कारण प्रवास थकवणारा होता त्यामुळे माझ्या मनातला गोंधळ आणखी वाढला. नंतर हो, नाही करताना त्यानेही अखेर संपूर्ण पाठिंबा देण्यासाठी संमती दाखवली. पण त्यापुढे खरं आव्हान होतं ते सासू-सासऱ्यांना या गोष्टीसाठी तयार करणं. घरी यायला उशीर होणार ही गोष्ट त्यांच्या पचनी पडेल की नाही याबद्दल माझ्या मनात शंका होती म्हणून अनेक दिवस

मी हा विषय त्यांच्याकडे काढण्याचं टाळतच होते. खरं तर माझ्याच मनाची पूर्ण तयारी होत नव्हती. अखेर सासूबाईंनीच मला याबद्दल विचारलं आणि मी त्यांना सगळया गोष्टींचा उलगडा करून सांगितला तेव्हा त्यांनी दिलेली प्रतिक्रिया माझ्यासाठी धक्कादायकच होती. मला त्या म्हणाल्या, तू घरचा विचार करू नकोस. इथलं सगळं सांभाळायला आम्ही आहोत. तुझं हेच वय आहे करियर करायचं तेव्हा तू त्यावरच लक्ष केद्रिंत कर, घर-संसार हे सगळं करायचंच आहे. मला त्यांची ही प्रतिक्रिया म्हणजे एक सुखद धक्काच होता. सासऱ्यांनीही तुला झेपणार असेल तर नक्की कर, अशी संमती दिली. एवढंच काय तर माझ्या नणंदेनं स्वत: गृहिणी असूनही नवीन काम स्वीकारण्याच्या बाजूने निर्णय घेण्यासाठी खूप प्रोत्साहित केलं. पण अखेर निर्णय घेताना मी कुटुंबाला प्राधान्य दिलं. लग्नाला केवळ चार महिने झालेले असताना थोडया अधिक आर्थिक कमाईसाठी मी संपूर्ण घराची घडी विस्कटून टाकणं आणि सर्वासाठीच विकतचा मनस्ताप ओढवून घेणं माझ्या मनाला पटलं नाही. इतरही अनेक छोटी-मोठी कारणं आहेत. ज्यामुळे माझ्या निर्णयाचा मी फेरविचार केला.

या घटनेमुळे माझं कुटुंब माझ्या पाठीशी कुठल्याही परिस्थितीत किती खंबीरपणे उभं राहू शकतं याची मला कल्पना आली. खरं तर माझ्या करियरबद्दल माझे नसतील एवढे माझ्या नवऱ्याचे प्लॅन्स आहेत, त्यामुळे त्याबाबतीत मी कुठेच मागे पडणार नाही याची खात्री आहे. ते नवीन काम न स्वीकारण्याचा निर्णय घेतल्यानंतर मनावरचं खूप मोठं ओझं उतरल्यासारखं वाटलं आणि का कोण जाणे पण काहीतरी कमावल्याच्या समाधानाने मन भरून आलं.

असे अनुभव सासरी, किती लग्न झालेल्या मुलींना येत असतील ते मला ठाऊक नाही, पण मला आलेल्या अनुभवाने मात्र माझ्या मनातला माझ्या कुटुंबातल्या प्रत्येक माणसाबद्दलचा आदर अनेक पटींनी वाढला आहे यात शंका नाही. अशा वेळी माझ्या मनात विचार येतो की, खरंच जर प्रत्येक सासरचे लोक आपल्या घरातल्या सुनेसाठी असे वागले तर आपल्याकडच्या किती स्त्रिया सुखा-समाधानाने जगू शकतील, नाही!

# बदलांचे आल्हाददायक वारे

*आपल्या आजूबाजूला दररोज कुणी न कुणी कंटाळा आला, असं म्हणताना आढळतंच. या कंटाळ्याचीसुद्धा गंमत असते. आपल्या दिनचर्येत थोडा जरी बदल केला तरी हा कंटाळा कुठल्या कुठं पळून जातो. लग्न नवीन असो की जुनं, त्यात तोचतोपणा कधीही येऊ शकतो. गरज असते ती आयुष्यात सतत काही छोटे-मोठे बदल घडवून आणण्याची आणि आत्मसात करण्याची! रस्त्यावर फुलं विकणारे जसं त्यांच्याकडची फुलं ताजीतवानी राहण्यासाठी वेळोवेळी त्यावर पाणी शिंपडतात, तशाच ताजं करणाऱ्या शिंतोड्यांची आपल्या दैनंदिन जीवनालाही आवश्यकता असते.*

आपल्यासोबत असं अनेकदा होतं, एखादी गोष्ट सतत करत राहिली की त्यातलं नावीन्य संपतं आणि आपल्याला ती गोष्ट कितीही चांगली असली तरी कालांतराने तिचा कंटाळा येतो. ‘किप इट इंटरेस्टिंग टू किप इट अलाइव्ह’ असं म्हटलं जातं ते उगीच नाही. अर्थात एखाद्या गोष्टीतली मजा कायम म्हणजेच जिवंत ठेवण्यासाठी त्यातलं नावीन्य टिकवून ठेवणं अतिशय महत्त्वाचं आहे. मग तो अभ्यास असो, काम असो किंवा अगदी कुठलंही नातं असो. ज्याप्रमाणे कामाच्या ठिकाणी आपण कामाच्या पद्धतींत वेगवेगळे प्रयोग केले, नावीन्य आणत राहिलो तर कामाची मजा वाढते आणि तोचतोपणा येऊन कंटाळा येत नाही. त्याचप्रमाणे संसार करतानाही हेच सूत्र आत्मसात करणं योग्य आहे. संगणकावर काम करताना नाही का तो फार अडकू लागला किंवा हँग झाला की आपण रिफ्रेश करतो, अगदी तसंच

> एखाद्या गोष्टीचा पटकन कंटाळा येणाऱ्या आमच्या पिढीसाठी लग्न आणि संसार या गोष्टी करणं आणि निभावणं म्हणजे खरंच मोठं आव्हान म्हटलं पाहिजे. कारण सगळ्याच गोष्टी कालांतराने बदलता येत नसतात, हे आम्हाला लग्नानंतर जास्त प्रकर्षाने जाणवू लागतं. माझी एक मैत्रीण कॉलेजमध्ये असताना नेहमी म्हणायची, ‘बाप रे, एकाच माणसासोबत अख्खं आयुष्य कसं काय काढतात लोक?’ आम्हाला तेव्हा तिच्या या बोलण्याची फार गंमत वाटायची

नात्यांनाही ताजंतवानं ठेवण्यासाठी रिफ्रेश करत राहावं लागतं यावर माझा पूर्ण विश्वास आहे.

ही संकल्पना कदाचित माझ्या आधीच्या पिढीला समजायला किंवा समजून घ्यायला कठीण जाईल कारण नात्यांमधला तोचतोपणा किंवा रिफ्रेश वगैरे करण्याची त्यांनी कधी स्वप्नातही कल्पना केली नसेल. पण आमच्या पिढीची एक फार मोठी समस्या आहे, आजार आहे असं म्हटलं तरी चालेल. आम्हाला कुठल्याही गोष्टीचा कालांतराने कंटाळा येऊ लागतो. मग त्या वापरत्या वस्तू असोत किंवा नोकऱ्या. आमच्या घरी मी किंवा माझ्या बहिणीने कधीही नोकरी बदलण्याचा विषय काढला कीआमचे बाबा वैतागायचे. एका जागी टिकताच येत नाही तुम्हाला, असं म्हणायचे. पण ३० वर्षं एका बँकेत निष्ठेनं नोकरी केलेल्या माझ्या बाबांच्या पिढीला हे पटवून घेणं कठीण आहे की आमच्या पिढीला नोकरीतील स्थैर्यापेक्षा कामाचं समाधान (ज्याला आपण जॉब सॅटिसफॅक्शन म्हणतो) अधिक महत्त्वाचं वाटतं. आज निम्म्याहून अधिक तरुणांचं नोकरी बदलण्यामागे हेच कारण असतं. नोकरीच कशाला पण इतर गोष्टी जसं मोबाइल, बाइक्स, हॅण्डबॅग्ज, हेअरकट, नेलपेंट, गर्लफ्रेंड, बॉयफ्रेंड असं सगळं सगळं आम्ही काही कालावधीने बदलतच असतो. एवढंच कशाला, आपल्या घरात नजर फिरवली तरी लक्षात येतं की आई, सासूबाईंनी त्यांच्या कित्येक जुन्या वस्तू इतक्या जपून वापरलेल्या असतात की त्या आजही व्यवस्थित कार्यरत असतात. याउलट आमच्या वस्तू मात्र जास्तीत जास्त चार-पाच वर्ष टिकतात आणि टिकल्या तरी त्या बदलून नवीन घेण्याची इच्छा काही वर्षांनंतर होतेच. 'जुने जाऊ द्या मरणा लागूनी, जाळूनी किंवा पुरूनी टाका' ही उक्ती आम्ही शब्दश: अमलात आणतो.

आता तुम्ही म्हणाल, हे सगळं मी काय सांगत बसलेय. तर हे सगळं सांगण्यामागचा हेतू एवढाच की एखाद्या गोष्टीचा पटकन कंटाळा येणाऱ्या आमच्या पिढीसाठी लग्न आणि संसार या गोष्टी करणं आणि निभावणं म्हणजे खरंच मोठं आव्हान म्हटलं पाहिजे. कारण सगळ्याच गोष्टी कालांतराने बदलता येत नसतात, हे आम्हाला लग्नानंतर जास्त प्रकर्षाने जाणवू लागतं. माझी एक मैत्रीण कॉलेजमध्ये असताना नेहमी म्हणायची, 'बाप रे, एकाच माणसासोबत अख्खं आयुष्य कसं काय काढतात लोक?'

आम्हाला तेव्हा तिच्या या बोलण्याची फार गंमत वाटायची पण आज ती लग्न करून, एका मुलाची आई होऊन गेली पाच वर्षं सुखाने संसार करतेय या गोष्टीची आम्हाला जास्त गंमत वाटते.

कुठलीही गोष्ट किंवा वस्तू सतत एकाच स्थितीत ठेवल्याने एक तर तिला गंज लागून ती निकामी होते किंवा ती अस्तित्वात असल्या-नसल्याचा फरक पडणं कमी होऊन जातं. नात्यांचंही असंच असतं. श्वास घेण्यासाठी हवा जितकी आवश्यक आहे तितकीच कुठल्याही प्रकारची नाती अखंड सुखानं नांदण्यासाठी त्यांच्यात हवा खेळती राहणं अत्यावश्यक आहे. म्हणूनच आपल्या आजूबाजूच्या, जवळच्या नात्यांना सतत प्राणवायू देत राहणं गरजेचं असतं. विशेषत: नवरा-बायकोच्या नात्यावर काही कालावधीनंतर जमणारी धूळ वेळोवेळी फुंकर मारून साफ करत राहता आली पाहिजे. माझं लग्न तर धूळ जमण्यासाठी खूपच नवीन आहे पण आतापासूनच काही अशा गोष्टींची आम्ही सवय लावून घेत आहोत जेणेकरून पुढं कंटाळा येण्याचे प्रसंग क्वचितच उद्भवतील.

उदाहरणार्थ सांगायचं तर, आमचं लग्न डिसेंबरच्या १३ तारखेला झालं त्यामुळे प्रत्येक महिन्याच्या १३ तारखेला आम्ही एकमेकांना काहीतरी भेटवस्तू देतो. कधीतरी खूप मोठी तर कधी छोटुशीच पण भेट न चुकता देतोच. पूर्ण महिनाभरात एकमेकांना कुठल्या वस्तूची आवश्यकता आहे याचा आम्ही अंदाज घेतो, मात्र प्रत्यक्षात काय भेट मिळणार याचा उलगडा १३ तारखेलाच होतो. यामुळे काय होतं की या महिन्यात कुठली वस्तू द्यायची हे ठरवण्यासाठी निरीक्षण आणि संशोधन सुरू होतं, त्यात वेळ मस्त जातो. त्यासोबत आपल्याला या महिन्यात काय मिळणार याची उत्सुकता असते, शिवाय एकमेकांना समजून घेण्याची उत्तम संधीही असते. रुटीनचा कंटाळा आला आणि खूप दिवस आपल्यात काहीच संवाद झाला नाही असं वाटलं की आम्ही एखादी छोटीशी पिकनिक करून येतो, ते शक्य झालं नाही तर आठवडय़ाच्या सुट्टीच्या दिवशी भरपूर गप्पा मारता येतील असा काहीतरी कार्यक्रम ठरवतो. याखेरीज छोटी-मोठी सरप्राईजेस आम्ही एकमेकांना देतच असतो. या छोटय़ा-छोटय़ा गोष्टी आपल्या दैनंदिन आयुष्यातला ‘कंटाळा’ दूर करण्यासाठी खरंच खूप फायदेशीर ठरतात.

आता तुम्ही म्हणाल, नवीन नवीन आहे सगळं तेव्हा मजा वाटणारच, आणखी एक वर्षाने हेच सगळं कायम राहतंय का ते बघू! खरं सांगायचं तर आम्ही हे अनेक जणांकडून ऐकलंय. पुढे कदाचित असं होणं शक्यही आहे पण म्हणून असं होतंच असा काही नियम नाही. परवाची गोष्ट सांगते. आम्ही असेच एका छोटय़ाशा पिझ्झा कॉर्नरमध्ये संध्याकाळी काहीतरी खाण्यासाठी गेलो होतो. तिथे एक सत्तर-पंच्याहत्तरीतलं जोडपं आलं आणि त्यांनी प्रत्येक पिझ्झाची व्यवस्थित माहिती घेऊन शेवटी मेक्सिकन पिझ्झाची ऑर्डर दिली आणि त्याचा मनसोक्त आनंद घेतला. चालतानाही त्रास होणारं ते जोडपं केवळ चेंज म्हणून पिझ्झा खायला आलं होतं. हे पाहिल्यावर मला असं वाटलं की आपण उगीचच वयाचा आणि आपल्यावरच्या जबाबदाऱ्यांचा बाऊ करत बसतो.

जबाबदाऱ्या प्रत्येकावरच असतात. पण स्वत:ला आणि आपल्या प्रियजनांना आनंदी ठेवण्याची जबाबदारी सगळयात मोठी आहे. सतत अभ्यासासाठी मागे लागणारे आई-बाबा जेव्हा अचानक एखाद्या संध्याकाळी मुलाला फिरायला घेऊन जातात, ऑफिस-घर अशी तारेवरची कसरत करणाऱ्या बायकोला जेव्हा नवरा अचानक एखाद्या दिवशी सिनेमा किंवा नाटक बघायला नेतो, रोज एकटेच मॉर्निंगवॉकला जाणाऱ्या बाबांना जेव्हा कधीतरी आपण सोबत करतो आणि त्यांच्या आवडीच्या विषयांवर गप्पा मारतो, संध्याकाळच्या जेवणाला काय बनवायचं असा प्रश्न दररोज पडलेल्या आईला आपण एखाद् दिवस जेवायला बाहेर घेऊन जातो तेव्हा त्या बदलातून मिळणारा आनंद मन उल्हसित करतं आणि दुसऱ्या दिवशीपासून तेच रुटीन पाळण्यासाठी आवश्यक उत्साह देतं. दैनंदिन आयुष्यात असे छोटे-मोठे बदल करून तर पाहा, हे नक्की सुखावह ठरतील याची खात्री आहे.

# थेंबे थेंबे तळे साचे

*घरातल्या इतर अनेक जबाबदाऱ्यांप्रमाणेच आर्थिक नियोजनाची जबाबदारी ही स्त्रियांनी न घाबरता स्वीकारायला हवी. बचत आणि नियोजन या दोन गोष्टी ज्या घरातल्या स्त्रीला शक्य होतात, ती घरासाठी काहीही कमी पडू देत नाही ही वस्तुस्थिती आहे. शिवाय थेंबा थेंबानं तळं बांधण्याची सवय पुढच्या पिढीला लावण्याचं काम त्या उत्तम प्रकारे करू शकतात, यात शंका नाही.*

इंग्रजीत एक प्रसिद्ध म्हण आहे, ‘एव्हरी रुपी सेव्हड इज अ रुपी अर्न्ड’ म्हणजेच प्रत्येक वाचवलेला रुपया हा तो कमावल्यासारखाच आहे. ही म्हण तशी मला खूप आधीपासून माहीत होती पण बचतीची आणि विशेषत: गुंतवणुकीची सवय मला आता लग्न झाल्यानंतर लागली. तोपर्यंत फक्त कमवायचं आणि खर्च करायचा एवढंच माहीत होतं. तसे बाबांनी बँकेचे सगळे व्यवहार आणि बचत करायला शिकवलं होतं, पण पैसे बँकेत जमा करणं आणि काढणं याखेरीज मी दुसरं काहीही करत नव्हते. कमावलेल्या रकमेचं योग्य नियोजन करण्याचा विचारही त्या वेळी मनाला शिवत नव्हता. त्यात माझी एक मानसिक समस्या अशी होती की बँकेच्या खात्यातली ठेव ठरावीक रकमेपेक्षा खाली आली की माझ्या जीवाची घालमेल सुरू व्हायची त्यामुळे गुंतवणूक वगैरे मी अनेक वर्ष टाळतच होते. शिवाय ती कागदपत्र सांभाळा, वेळोवेळी त्यावर लक्ष ठेवा, बँकेच्या अधिकाऱ्याकडे चकरा

उत्तम नियोजनात स्त्रियांचा हातखंडा असतोच, मग आर्थिक क्षेत्रातही तो असलाच पाहिजे. आपल्याकडे अरुंधती भट्टाचार्य (स्टेट बँक च्या अध्यक्षा), चंदा कोचर (ICICIच्या CEO), ॲक्सिस बँकेच्या CEO शिखा शर्मा, बँक ऑफ इंडियाच्या अध्यक्षा विजयालक्ष्मी अय्यर एवढंच काय तर भारतीय महिला बँकेच्या अध्यक्षा आणि MD उषा अनंथसुब्रमण्यम अशा एकापेक्षा एक राष्ट्रीय-आंतरराष्ट्रीय पातळीवर आर्थिक व्यवहार संभाळणाऱ्या महिलांची भली मोठी यादी आहे. मग आपण साधं घरातले आर्थिक व्यवहार सांभाळायला संकोच आणि न्यूनगंड का बाळगायचा?

मारा, याचा मला प्रचंड कंटाळा होता. पण लग्नानंतर आता नवरा स्वत:च अर्थ क्षेत्रातला असल्यामुळे त्याने हळूहळू मला गुंतवणुकीचं, त्यामुळे भविष्यात होणाऱ्या फायद्यांचं महत्त्व उदाहरणांसकट पटवून दिलं आणि इथल्या मंडळींचा एकंदरीत बचत आणि गुंतवणुकीतला उत्साह पाहून मलाही आपोआप ती सवय लागली आणि मी पुढचं पाऊल टाकलं.

माझ्यासारख्या इतर अनेक जणी असतील ज्यांना गुंतवणूक किंवा बँकेचे व्यवहार म्हणजे डोकेदुखी वाटत असेल. म्हणूनच आजही अनेक स्त्रिया घरातल्या आर्थिक व्यवहारांकडे जाणूनबुजून दुर्लक्ष करतात. जसं एक साक्षर स्त्री संपूर्ण घराला शिक्षित करू शकते, असं म्हणतात त्याचप्रमाणे घरातल्या आर्थिक व्यवहारांबद्दल सजग असलेली स्त्री घराला कोणत्याही परिस्थितीचा सामना करण्यासाठी तयार करू शकते. काही जणी 'ते' सगळं आमचे 'हे'च बघतात असं म्हणून या जबाबदारीतून काढता पाय घेतात. पण जरी तुमचे 'हे' या बाबी बघत असतील तरी आपल्याला या आर्थिक बाबींमध्ये पूर्णपणे अज्ञानी राहण्याची काहीच आवश्यकता नाही. अडीनडीच्या काळात जर अचानक आर्थिक व्यवहार करावे लागले तर या व्यवहारी जगात कसा निभाव लागायचा? फार दूर कशाला जा, माझी स्वत:ची आई देखील तिच्याशी निगडित आर्थिक बाबींच्या कागदपत्रांवर स्वाक्षरी करण्यापलीकडे त्यात लक्ष घालत नाही. आपल्या नावे कुठे किती गुंतवणूक आहे, आपण कुठे नॉमिनी आहोत अशा गोष्टींची माहिती करून घेण्याची तिला अजिबात गरज वाटत नाही. आर्थिक व्यवहार पाहत नसलो तरी त्याची माहिती ठेवायला काय हरकत आहे. चला, माझ्या आईचं एक वेळ ठीक आहे की ती स्वत: कमावत नव्हती त्यामुळे बाबांनी त्यांच्या कमाईसोबत काय करावं यात तिनं फारसं लक्ष घातलं नाही पण नोकरी करणाऱ्या स्त्रिया जेव्हा असं वागतात तेव्हा फार आश्चर्य वाटतं.

विश्वास बसणं थोडं कठीण आहे पण आजही अनेक कमावणाऱ्या स्त्रिया महिन्याचा पगार नवऱ्याच्या हातात ठेवतात. माझ्या एका जुन्या सहकाऱ्याच्या घरी हीच पद्धत होती. बायकोला खर्चासाठी लागतील तसे ती पैसे त्याच्याकडून मागून घेत असे. यावरून तो अनेकदा तिला एवढे पैसे कशाला लागतात, आताच तर शॉपिंग केली होती, काही गरज नाही, असं काही काही ऐकवताना मी अनेकदा ऐकलं आणि न राहवून शेवटी एक दिवस त्याला आगाऊपणे विचारलंच की, 'अरे, तुझी बायकोसुद्धा नोकरी करते ना! मग प्रत्येक गोष्ट खरेदी करताना, अगदी सहकाऱ्यांसोबत बाहेर जेवायला जातानाही तुझी

परवानगी का घेते? 'त्यावर तो म्हणाला 'हो, नोकरी करते ना ती, पण तिचा पगार माझ्या ताब्यात असतो. तिच्या हातात पैसे दिले तर सगळे उधळून टाकेल ती!' हे ऐकून काय बोलावं हेच मला कळेना. पण खरा धक्का मला त्या वेळी बसला जेव्हा हे कळलं की त्याची बायको एका कंपनीत अकाउंटंट म्हणून काम करते. म्हणजे एका कंपनीचे आर्थिक व्यवहार सांभाळू शकणारी स्त्री घराचे आर्थिक व्यवहार सांभाळू शकणार नाही, असं त्या नवऱ्याला का बरं वाटलं असेल? या प्रश्नाचं उत्तर मला आजही मिळालेलं नाही. म्हणजे खरंच स्त्रिया आर्थिकदृष्टय़ा स्वतंत्र झालेल्याच नाहीत आणि हे पारतंत्र्य किंवा दुसऱ्यावर अवलंबणं केवळ अज्ञानातून आलेलं आहे. त्यामुळे आता हे अज्ञान दूर करण्याचीच वेळ आलेली आहे.

माझ्या या घरी सगळेच आर्थिक व्यवहारांबद्दल इतके माहीतगार आहेत की मला सुरुवातीला याबाबतीत अगदीच शून्य माहिती असल्यासारखं वाटू लागलं. पण पुढे जसे मला बचतीचे, गुंतवणुकीचे फायदे समजू लागले तशी मीही त्याकडे आणि पैशांच्या नियोजनाकडे वळले. खरंच, दुसरं तिसरं कशाचीही नाही पण फक्त योग्य नियोजनाचीच यासाठी आवश्यकता असते आणि उत्तम नियोजनात स्त्रियांचा हातखंडा असतोच, मग आर्थिक क्षेत्रातही तो असलाच पाहिजे. आपल्याकडे अरुंधती भट्टाचार्य (स्टेट बँक ऑफ इंडियाच्या अध्यक्षा), चंदा कोचर (आयसीआयसीआय बँकेच्या मुख्य कार्यकारी अधिकारी आणि व्यवस्थापकीय संचालक), ॲक्सिस बँकेच्या मुख्य कार्यकारी अधिकारी आणि व्यवस्थापकीय संचालक शिखा शर्मा, बँक ऑफ इंडियाच्या अध्यक्षा आणि व्यवस्थापकीय संचालक विजयालक्ष्मी अय्यर एवढंच काय तर भारतीय महिला बँकेच्या अध्यक्षा आणि व्यवस्थापकीय संचालक उषा अनंथसुब्रमण्यम अशा एकापेक्षा एक राष्ट्रीय-आंतरराष्ट्रीय पातळीवर आर्थिक व्यवहार संभाळणाऱ्या महिलांची भली मोठी यादी आहे. मग आपण साधं घरातले आर्थिक व्यवहार सांभाळायला संकोच आणि न्यूनगंड का बाळगायचा? आता तर महिलांसाठी विशेष बँक विशेष सोयी-सवलती, विशेष खाती, बचत गट असे अनेक पर्याय उपलब्ध आहेत. याही पुढे जाऊन महिलांसाठी शेअर बाजाराचं विशेष प्रशिक्षणही आज उपलब्ध आहे.

वास्तविक स्वत: कमावत्या नसल्या तरी नवऱ्याच्या कमाईचं देखील उत्तम नियोजन करणाऱ्या अनेक स्त्रिया मी आजूबाजूला पाहते आणि तशी सवय आपल्या मुलांनाही लावायला त्या चुकत नाहीत. लहानपणापासूनच पिगी बँकच्या माध्यमातून

मुलांना बचतीची सवय लावून थेंबा थेंबानी तळं साचतं ही शिकवण पुढच्या पिढीला द्यायलाच हवी, त्याशिवाय त्यांना त्यातलं महत्त्व कळणार नाही. खरं तर वर नमूद केलेली एवढी मोठी नावं घ्यायचीही गरज नाही. आपल्या आई-आजींना नाही का आपण घरखर्चातले थोडे थोडे पैसे वाचवून स्वत:चा एक 'सिक्रेट फंड' बनवताना पाहिलंय! अडीअडचणीच्या काळात हा फंडच कामी येत असतो. अगदी घरकाम करणाऱ्या अशिक्षित बायकाही अशा प्रकारे त्यांच्या मुलांच्या भविष्यासाठी पैशांची बचत करताना आपण पाहतो. माझ्याप्रमाणे थोडा आळस आणि कंटाळा सोडून बचत आणि गुंतवणुकीचं महत्त्व समजून घेतलं की पुढची कृती करण्याची प्रेरणा आपोआप मिळेल. आज कमावलेल्या, बचत केलेल्या पैशांमधून योग्य नियोजन करून जेव्हा मी घरासाठी किंवा कुटुंबातल्या सदस्यांसाठी काही करू शकते तेव्हा मिळणारं समाधान सुखदायी आहे.

स्त्री घरातल्या अर्थकारणाचा अविभाज्य घटक आहे त्यामुळे तिनेच त्याबद्दल सजग असायला हवं. घरातली आवक, महिन्याचा खर्च, इतर बिलं, खरेदी, चैन वगैरे करूनही मिळकतीच्या काही टक्के रक्कम बचत करण्याची जबाबदारी घरातल्या पुरुषांसोबतच स्त्रियांचीही आहे. आज स्त्रिया बँकांपासून, शेअर बाजारापर्यंत मजल मारत असताना समाजातल्या प्रत्येक स्तरातील स्त्रियांमध्ये आर्थिक साक्षरता आणि सजगता आता यायलाच हवी.

# आरोग्यम् धनसंपदा

*रोजच्या धावपळीत आपण इतके मश्गूल झालेले असतो की आपल्या आरोग्यासाठी वेगळा वेळ देणं कठीण होऊन जातं. योग्य आहार आणि व्यायाम हा सुप्रसिद्ध नियम मी तुम्हाला पुन्हा सांगणार नाहीये, तर आपण स्त्रिया आपल्या आरोग्याकडे जे दुर्लक्ष करतो त्याबद्दल आणि मला या गोष्टीमुळे बसलेल्या फटक्याबद्दल तुम्हाला आज सांगणार आहे आणि सतर्क करणार आहे.*

'आपल्या शरीराचं आरोग्य राखणं हे आपलं कर्तव्य आहे, नाहीतर आपण आपलं मन कदापि खंबीर आणि स्वच्छ ठेवू शकणार नाही' असं गौतम बुद्धांनी म्हटलंय. नुकतीच बुद्ध पौर्णिमा साजरी झाली तेव्हा हे वाचनात आलं होतं. त्यावर थोडं आत्मचिंतन केल्यावर लक्षात आलं की, आपण आपल्या शारीरिक आणि अनेकदा मानसिक आरोग्याबाबतही किती निष्काळजी असतो.

कधी रोज थोडी थोडी दुखणारी पाठ, कंबर, डोकं यांच्याकडे दुर्लक्ष करतो तर कधी दिवसागणिक वाढत चाललेल्या चिडचिडीला नॉर्मल समजण्याची चूक करतो. थोडक्यात, आपण आपल्या शरीराला कायम गृहीत धरत असतो. मग एके दिवशी हे शरीरच बंड करून उठतं आणि आपले सगळे व्यवहार ठप्प करून टाकतं. तेव्हा सक्तीने विश्रांती घेण्यावाचून पर्यायच उरत नाही आणि डॉक्टरची बिलं पाहून भोवळ यायची वेळ येते.

अगदी छोटी छोटी दुखणीही पुढे जाऊन गंभीर स्वरूप घेऊ शकतात. विशेषत: आपण स्त्रिया दुखणं अंगावर काढण्यात म्हणजेच त्याकडे दुर्लक्ष करण्यात माहीर असतो. आमच्या एका डॉक्टरने मला एकदा सांगितलं होतं की आपल्या शरीराचे क्लिष्ट कारभार अव्याहतपणे सुरूच असतात. आपलं खाणं-पिणं, व्यायाम, इतर सवयी या कारभाराला सहाय्य करत असतात.

जेव्हा आपल्या सवयी बदलतात तेव्हा या कारभारांमध्येही बदल होतात आणि ज्या अवयवाला किंवा इंद्रियाला आपण लक्ष देण्याची गरज असते तो दुखू लागतो.

लहान मुलाला भूक लागल्यावर जसं तो रडून आपलं लक्ष वेधून घेतो त्याचप्रमाणे हा अवयव दुखून आपल्याला सांगत असतो की मला उपचारांची गरज आहे. हे ऐकताना मला फार मजा वाटली पण त्यानंतर कधीही काही दुखलं की असं वाटतं, जणू माझा तो अवयव माझ्याशी त्या दुखण्याच्या माध्यमातून संवाद साधतोय. आणि डॉक्टरनी दिलेल्या त्या उदाहरणामुळे असा विचार येतो की ज्याप्रमाणे भुकेल्या मुलाकडे रडू लागल्यावर आई दुर्लक्ष करू शकत नाही त्याप्रमाणे आपणही आपल्याला मदतीसाठी हाक मारणाऱ्या अवयवाकडे दुर्लक्ष करता कामा नये.

पण प्रत्येक वेळी थोडंसं काही दुखलं की लगेच डॉक्टरकडे धावा, असंही करता येत नाही. कधी वेळेअभावी तर कधी घरच्या घरी होणाऱ्या उपचारांवर अधिक विश्वास असल्याने आपण योग्य उपचारांना नकळत टाळतो. मी आज तुम्हाला हे सगळं सांगतेय कारण मी अशी चूक करून झाली आहे. माझ्या टाचेच्या मागचं हाड अनेक दिवसांपासून थोडं दुखत होतं पण मी त्याकडे सपशेल दुर्लक्ष केलं. त्यानंतर लग्नात छान दिसायचं म्हणून लग्नाआधी तीन महिने जिममध्ये प्रचंड मेहनत केली. त्या मेहनतीचं फळ मला अपेक्षित होतं त्याप्रमाणे मिळालं पण माझ्या त्या दुखऱ्या हाडावर व्यायामांचा अतिरिक्त ताण येऊन दुखणं वाढलं. एवढं होऊनही मी इंटरनेटवर यावरचे उपाय शोधले आणि बर्फाने शेकू लागले त्यामुळे तात्पुरता आराम पडत होता पण तेव्हा लग्नाची तयारी इतकी जोरात सुरू होती की पायाच्या दुखण्याकडे बघायला अजिबात फुरसत नव्हती.

लग्न पार पडलं आणि दोन महिन्यांनंतर या दुखण्याने पुन्हा डोकं वर काढलं. यावेळीसुद्धा मी त्याच्याकडे दुर्लक्षच करत होते पण आता दुखणं असह्य झालं होतं. रोज मुलुंड ते परेल ट्रेनने गर्दीत कधी उभ्याने प्रवास करताना नाकी नऊ येऊ लागले तेव्हा नाइलाजाने डॉक्टरकडे गेलेच. त्यावेळी एक्स-रे काढल्यावर समजलं की, दोन्ही टाचांच्या मागच्या बाजूचं हाड वाढलंय, नंतर आठवडाभर रोज त्या हॉस्पिटलमध्ये जाऊन वेदनादायी उपचार घ्यावे लागत होते. अजूनही दुखणं पूर्णपणे गेलेलं नाहीच आहे. भविष्यात पुन्हा उसळून येईल याची भीती आहेच.

मी वेळीच या दुखण्यावर थोडा वेळ काढून योग्य उपचार केले असते तर आताच्या त्रासापासून वाचले असते. माझ्या सासरच्या मंडळींची मला साथ आहे म्हणून बरं, नाहीतर सगळंच कठीण होऊन बसलं असतं. आमच्या घरी माझ्या सासूबाई स्वत:ची तब्येत जपण्याबाबत उत्तम आदर्श आहेत. त्यांना डायबेटिस असल्यामुळे आहारातलं पथ्य आणि नियमित औषधं याचा नेम त्या कधीच चुकवत नाहीत. मला त्या नेहमी एक गोष्ट सांगतात की, आपल्याला, घरातल्या बायकांना आपली तब्येत जपलीच पाहिजे कारण आपल्याला घर चालवायचंय. घरातली स्त्री आजारी पडली की सगळे व्यवहार जणू थांबून जातात. तुम्हालाही याचा अनुभव असेलच.

मला झालेला त्रास तरीही बरा होण्यासारखा होता पण अनेकदा काही गंभीर आजारांचं निदान केवळ दुर्लक्षामुळे उशिरा होतं आणि काही प्रसंगांत वेळ निघूनही गेलेली असते. स्त्रियांमध्ये वयोमानानुसार अनेक बदल घडत असतात त्यामुळे योग्य वेळी सावधपणा दाखवून जरुरी उपचार करून घेण्यातच शहाणपण आहे. आपल्याकडे स्त्रियांमध्ये थायरॉइड, कर्करोग, स्तनांचा कर्करोग, मासिक पाळीच्या समस्या, सिस्ट, लठ्ठपणा, रक्ताची कमतरता, आवश्यक जीवनसत्त्वांची कमतरता अशा अनेक सर्वसाधारणपणे आढळणाऱ्या समस्या आहेत. त्यातल्या काही जीवघेण्याही आहेत. त्यामुळे ठरावीक कालावधीनंतर आणि विशेषत: लग्न करण्यापूर्वी सर्व वैद्यकीय चाचण्या करून घेण्याचा नेम ठेवायला हवा.

घरातल्या इतरांची काळजी घेताना आणि आपली नोकरी, संसार सांभाळताना स्वत:च्या आरोग्याकडे आपण दुर्लक्ष करता कामा नये. घरातली स्त्री सुदृढ तर घर सुदृढ, असं म्हणतात ते शंभर टक्के खरं आहे.

# माझिया माहेरा जा रे पाखरा...

*मायेचं माहेर आणि सुखाचं सासर याहून अधिक एखाद्या विवाहितेला कसली आकांक्षा असणार. पण काही वेळा आपल्याच अविवेकामुळे यातला समन्वय तुटतो आणि मायेच्या ओढीनं हातचं सुख गमावण्याची वेळ येते. असं होऊ नये म्हणूनच सासर-माहेरचा योग्य ताळमेळ साधण्याची कसरत जमायलाच हवी. त्यातही खूप मजा आहे.*

आपल्यापैकी प्रत्येकच मुलगी लहानपणी आईला हे विचारत असते कि मुलींनाच का गं आपलं घर सोडून दुसऱ्या घरी जावं लागतं? आणि त्यावर एक उत्तर हमखास मिळतं कि जर मुलगी लग्न करून तिच्या सासरी गेली नाही तर उद्या तिच्या मुलीला माहेर कसं मिळणार? 'माहेर' या शब्दात जितका जिव्हाळा आणि ओलावा आहे तितकाच किंबहुना त्याहून कितीतरी जास्त प्रत्यक्ष माहेरात असतो. माहेरचं महत्त्व सासरी गेल्याशिवाय उमगत नाही हेच खरं.

मला आठवतं कधीतरी लहानपणी आईसोबत अशाच निवांत दुपारी गप्पा मारताना आमच्या (मी आणि ताई) लग्नाचा, मग आम्ही तिला सोडून जाणार असा सगळा विषय निघाला आणि तेव्हाच पाठवणीसारख्या आम्ही तिघी रडलो होतो. हातातल्या इवल्याशा लेकीला पाहूनही बापाच्या डोळ्यात कदाचित म्हणूनच पाणी येत असावं.

अनेक जणींना जवळ आहे म्हणून उठसूट माहेरी पळण्याची सवय असते. पण असं केल्याने आपल्या माहेरी जाण्याचं काहीच अप्रूप राहत नाही. आपल्याला जशी माहेरी जाण्याची ओढ लागते तशी त्यांनाही लागायला हवी. कारण या हुरहुरीनंतर भेटण्यातला आनंद निराळाच आहे. विशेषतः माहेरी भाऊ आणि वहिनी असेल तर आपल्या सतत जाण्याने त्यांच्या संसारात लुडबुड होणार नाही याचं भान ठेवून कधीतरीच गेल्याने आपला मानही राखला जातो.

मुलीला वाढवणाऱ्या आई-वडिलांचं म्हणून मला अधिक कौतुक वाटतं. तळहातावरल्या फोडासारखं त्या 'परक्या धना'ला जपायचं, वाढवायचं, स्वतःच्या पायांवर उभं करायचं आणि एक दिवस कुणीतरी, कुठूनतरी येतं आणि जन्मदाते त्या कन्येवरचा हक्क चेहऱ्यावर हसू आणि डोळ्यात आसू अशा अवस्थेत सोडून देतात.

सासर चांगलं असो वा वाईट पण मुलीला माहेरचा ओढा असतोच. माझे सासरे मी माहेरी निघाले कि गमतीने हिरव्या चाऱ्यावर चालली असं म्हणतात.

माझं माहेर सावली,
उभी दारात माऊली,
तिच्या काळजात बाई
माया-ममतेचा झरा!
मला माहेरी पाठवा,
मला माऊली भेटवा,
माझ्या आईच्या पंखात
मला मिळू दे उबारा!

या खेबुडकरांच्या ओळी तेव्हा नकळत मनात तरळून जातात.

इतर सगळया गोष्टी लग्नानंतर जुन्या होत असतील, अंगवळणी पडत असतील पण माहेराकडची ओढ लग्नाला कितीही वर्ष झाली तरी कमी होत नाही हेच खरं. माझ्या आईला, सासूबाईना आजही त्यांच्या माहेरच्या माणसांची तेवढीच काळजी आणि ओढ असते जेवढी कदाचित लग्नाच्या वेळी होती. इथेच खरंतर स्त्रीची कसोटी लागते. कारण माहेर कितीही आठवलं आणि आवडलं तरी सासर-माहेरात योग्य समन्वय साधता यायलाच हवा. नाहीतर ना धड इथल्या ना तिथल्या अशी परिस्थिती होऊन जाते किंवा कुठल्यातरी एका बाजूलाच कल अधिक होऊन जातो. माझं लग्न ठरण्याच्याही आधी मी एक गोष्ट निश्चित केली होती, ती म्हणजे माझं सासर-माहेर जरी एक कुटुंब, एक घर म्हणून एकत्र आलं तरी दोन्ही घरातल्या खासगी गोष्टी मी कधीही पलीकडे सांगणार नाही आणि महत्त्वाचं म्हणजे लग्नाला सहा महिने होत आले आहेत तरीही मी ही गोष्ट नेटाने पाळतेय आणि पाळत राहणार. अगदी माझ्या आणि माझ्या नवऱ्याच्या पहिल्या भांडणाबद्दल देखील माझ्या आई-वडिलांना या सदरातल्या लेखामधूनच समजलं. यातून मी माझे प्रश्न माझ्या

पद्धतीने आणि स्तरावर सोडवू शकते असा आत्मविश्वास आणि एक वेगळंच आत्मिक समाधान मिळतं.

मी असं ठरवलं यालाही कारण आहे. माझ्या एका मैत्रिणीचा किस्सा सांगते. लग्न झाल्या दिवसापासूनच तिच्या सासरच्या माणसांबद्दल, तिथल्या परिस्थितीबद्दल सतत तक्रारी असत आणि त्या साऱ्या तक्रारी ती आईला आणि मैत्रिणींना फोन करून किंवा प्रत्यक्ष भेटून सांगत असे. सुरुवातीला नवीन आहे, असं वाटून आम्ही दुर्लक्ष करत असू पण नंतर तिला याची सवय लागली. कधीही भेटल्यानंतर किंवा फोन केल्यानंतर तिची ही एकच टेप सुरू व्हायची. शेवटी कंटाळून तिला फोन करणंच बंद केलं, अगदी तिच्या आईने देखील फोनचं प्रमाण खूप कमी केलं. या वरून एक गोष्ट माझ्या लक्षात आली कि एकदा सासरी गेल्यानंतर तिथल्या परिस्थितीचा सामना तुम्हालाच करायचा असतो, त्यासाठी इतर कुणाच्याही मदतीची अपेक्षा करणं मूर्खपणाचं आहे. आता या सगळ्या गोंधळात त्या मैत्रिणीचं सासरबद्दलचं मत कायमचं कलुषित झालं आणि अर्थात त्यांचंही; शिवाय हिच्या माहेरच्या लोकांना हिच्या समस्यांचं गांभीर्य वाटणं कमी झालं आणि तिकडच्या मंडळींबद्दल मत वाईट झालं. हे सगळं काही केवळ तिच्या थोडया संयमाने आणि समजूतदारपणाने टाळता आलं असतं.

आपल्याला प्रत्येक बाबतीत आई-वडिलांचा सल्ला घेण्याची सवय असणं उत्तमच आहे पण म्हणून त्यांच्यावर विसंबण्याची आवश्यकता नाही. प्रत्येकवेळी त्यांच्या सुरक्षित पदराचा आडोसा न शोधता आपल्या अडचणींतून आपण स्वतः मार्ग काढला तर त्यांना अधिक समाधान नाही का लाभणार? पण लग्न जुनं झालं तरीही सासरच्या लोकांना दुर्लक्षून माहेरच्या पद्धतींना कवटाळून बसण्याची सवय असणाऱ्या अनेक स्त्रिया माझ्या भोवताली आहेत.

अनेक जणींना जवळ आहे म्हणून उठसूट माहेरी पळण्याची सवय असते. पण असं केल्याने आपल्या माहेरी जाण्याचं काहीच अप्रूप राहत नाही. आपल्याला जशी माहेरी जाण्याची ओढ लागते तशी त्यांनाही लागायला हवी. कारण या हुरहुरीनंतर भेटण्यातला आनंद निराळाच आहे. विशेषतः माहेरी भाऊ आणि वहिनी असेल तर आपल्या सतत जाण्याने त्यांच्या संसारात लुडबुड होणार नाही याचं भान ठेवून कधीतरीच गेल्याने आपला

मानही राखला जातो. थोडक्यात, रोज येण्या-जाण्याने माहेरी जाण्यातली मजा घालवून बसू नये असं मला वाटतं.

माझी गिरगावात बसमधली एक मैत्रीण आहे, आमच्या बाजूच्याच वाडीत राहते. तिचा छोटासा दीड वर्षांचा मुलगा आहे. सासर-माहेर बाजुबाजुच्या बिल्डींगमध्ये त्यामुळे ही रोज ऑफिसला येताना मुलाला आईकडेच ठेऊन येते आणि जाताना घेऊन जाते. तिच्या सासरी सासूबाई आणि इतर मंडळी असताना आणि त्यांची बाळाची काळजी घेण्याची तयारी असतानाही! का तर आईवर जास्त विश्वास आहे. आणि सासरच्या माणसांचा बाळावर काहीच अधिकार नाही का? आता अशा मुलींना काय म्हणायचं, हेच मला कधीतरी समजत नाही. माहेरची नाती तोडून टाकावीत असं माझं मुळीच मत नाही पण सासरच्या माणसांना जर संधीच दिली नाही तर ते घर आपलं आणि आपण त्यांचे कधीही होऊ शकणार नाही.

मी माझ्या आईशी रोज दुपारी-रात्री फोनवर बोलतेच पण सासूबाईंशीही दररोज न चुकता गप्पा मारते. त्या मला आमच्या कुटुंबाबद्दल, आजवर झालेल्या घडामोडींबाबत, नातेवाईकांबद्दल बरंच काही सांगतात. मी ही त्यांना माझ्याबद्दल, माझ्या माहेरच्या नातेवाईकांबद्दल वगैरे सांगते. मी आणि आई जितक्या सहजपणे गप्पा मारतो तितक्याच सहजतेने आमच्यातलाही संवाद होत असतो. सासरच्या माणसांनी आपल्यासाठी घराचे आणि मनाचे दरवाजे उघडलेले असतात, अशावेळी आपणही त्याला योग्य प्रतिसाद देण्याची आवश्यकता असते. पण कायम माहेरातच मन गुंतलेलं राहिलं तर आपण आपल्या घराच्या कधीच होऊ शकत नाही. शिवाय आपल्या लहान-सहान समस्या स्वतः सोडवण्यातही समाधान आहेच.

आपल्या कुठल्याही प्रसंगी माहेरची माणसं पाठीशी उभी राहतातच पण म्हणून कायम त्यांच्यावर विसंबून राहणं किंवा त्यांच्यासाठी स्वतःच्या घरच्यांकडे, घराकडे दुर्लक्ष करणं योग्य नाही. प्रेम दोन्हीकडे देता आलं पाहिजे, दोन्हीकडून घेता आलं पाहिजे, त्याचप्रमाणे दोन्हीकडच्या नात्यांचा आदरही करता यायला हवा तरच नात्यांचा समन्वय साधणं शक्य आहे.

## जावई माझा भला!

*मुलीचं लग्न लावताना लेक घरातून जातेय यापेक्षा एक हक्काचा मुलगा आपल्या कुटुंबात प्रवेश करत आहे, ही भावना वधूच्या मात्या-पित्यांना जेव्हा येते तेव्हा एका उत्तम जावयाचा शोध लागलेला असतो असं समजावं. चांगला मुलगा, पती, भाऊ, मित्र अशा अनेक भूमिका निभावत असतानाच जावयाची भूमिकाही उत्तम वठवता येणं आवश्यक आहे. सासू-सासरे आणि जावयाचं एक अनोखं नातं मी सध्या अनुभवत आहे, आज त्याबद्दल थोडं सांगते.*

अनेक किस्से कहाण्यांनी भरलेल्या माझ्या लग्नानंतरच्या या रोचक सफरीत तुम्हा वाचकांना सामील करून घेतल्यामुळे वेळोवेळी माझा आनंद द्विगुणीत होत आहे तर काही सल वाटले जात आहेत. कधीतरी वाटतं, प्रत्येकच नवविवाहितेला तिचं मन मोकळं करण्यासाठी अशी एखादी जरी जागा सापडली तरी तिच्या मनावरचा ताण कितीतरी हलका होईल, नाही! पण या सदरातील लेखांना मिळणाऱ्या विविध प्रतिक्रियांवरून असं लक्षात येऊ लागलं आहे की, अशा अनेक नवविवाहितांचं मी इथे प्रतिनिधित्वच करत आहे.

असो, या सदरातून आपण आजवर अनेक नात्यांचे पदर उलगडण्याचा प्रयत्न केला. काही नाती जिव्हाळ्याची तर काही किचकट पण सारीच जगण्याचा आधार बनणारी, काही नाती निभावायला जितकी क्लिष्ट, कठीण वाटतात तितकीच थोडया प्रयत्नांनी मजेशीर आणि हलकी फुलकीही करता येतात. असंच एक नातं असतं जावई आणि सासू-सासऱ्यांचं! जसं घर सुखाने नांदण्यासाठी घरात येणारी सून चांगली असावी लागते, त्याचप्रमाणे घरादाराच्या मन:शांतीसाठी आपण ज्याला आपली लेक सोपवत आहोत तो जावईदेखील चांगलाच निघावा लागतो, नाही तर लेकीचं लग्न लावून

> आपल्या बायकोनं आपल्या आई-वडिलांकडे लक्ष द्यावं, त्यांना काय हवं-नको ते बघावं, त्यांच्याशी अगदी मुलीप्रमाणे राहावं अशी अपेक्षा जेव्हा नवरा ठेवत असतो तेव्हा आपल्या पत्नीच्याही आपल्याकडून तिच्या आई-वडिलांबद्दल अशाच अपेक्षा असू शकतात, याचा विचार व्हायला हवा. सासू-सासरे ही जशी सुनेची जबाबदारी आहे तशीच जावयाचीही आहे, हे मानणाऱ्या तरुणांची संख्या वाढतेय, ही चांगली बाब आहे.

दिल्यानंतर मन:स्तापाचा कधीही न संपणारा एक नवा अध्याय सुरू होतो.

'जावई हा दशमस्थानातील ग्रह असतो' अशी म्हण पूर्वापार प्रसिद्ध आहे. ग्रह-तारे आणि त्यांच्या स्थानांबद्दल मला फारशी माहिती नाही पण काही जावई सासू-सासऱ्यांना दिवसा तारे दाखवतात हे खरं! जावईशोध ही म्हणूनच गवताच्या गंजीतून सुई शोधण्याइतकी कर्मकठीण गोष्ट बनून जाते. उत्तम जावयाच्या शोधात मुलीचे वडील जोडे झिजवतात तर आई नवस-सायास करते. मनासारखा जावई मिळावा यासाठी एखादं व्रत किंवा उपास-तापास करता आला असता तर तेही मुलीच्या लग्नाची स्वप्न पाहणाऱ्या आईनं केलं असतं. जसं वटपौर्णिमा आणि हरतालिकेचं व्रतही त्या श्रद्धेनं पूर्ण करतात. म्हणूनच प्रेमविवाह असो की नियोजित, जावयाचा मान नेहमी मोठाच असतो.

पूर्वीच्या काळी 'जावई रुसणं' हा जणू काही एक विधीच असायचा. म्हणजे लग्नाच्या मंडपात ऐन मुहूर्ताच्या वेळी नवरा मुलगा स्कूटर, फ्रीज, टीव्ही किंवा सोन्याचा एखादा दागिना अशा कुठल्याशा महागडया वस्तूसाठी अडून बसत असे. एवढंच काय तर अमूकच एक कोल्ड्रिंक प्यायला हवं म्हणूनही अडून बसलेल्या त्या काळच्या नवरदेवांच्या कथा मी ऐकल्या आहेत. आपल्या घरातल्या आजीकडून अशा अनेक लग्नांच्या कहाण्या ऐकायला मिळतील. खरं तर अडवणूक करण्याच्या या साऱ्या गोष्टी पूर्वनियोजित असत. मुहूर्त चुकू नये म्हणून मग नवरीचे वडील, आई आणि माहेरचा इतर गोतावळा त्यांच्या मागण्या थोडं 'बार्गेनिंग' करून पूर्ण करत असत. तेव्हाचा काळ अगदीच वेगळा होता. शिक्षणानं आणि बदलत्या राहणीमानानं या गोष्टी इतिहासजमा केल्या आहेत.

आजची मुलं प्रेयसीच्या वडिलांना 'सर' म्हणतात आणि लग्न ठरल्यावर सरळ 'बाबा' किंवा 'पप्पा' बनवून टाकतात. असं असलं तरी सासू-सासऱ्यांना त्रास देणारे जावई आजही आहेतच. छोटया-छोटया गोष्टींवरून रुसून बसणारे, स्वत:चं महत्त्व वाढवण्यासाठी अनेक गोष्टींमध्ये अडवणूक करणारे, एवढंच काय तर सासऱ्याला लुबाडून संपत्ती बळकावणारे असे अनेक महाभाग आजही आहेतच. पण बायकोचा आणि तिच्या माहेरच्यांचा आदर करणाऱ्या तरुणांचं प्रमाण आजूबाजूला वाढताना दिसतंय. मी इथल्या घराबद्दल आणि माझ्या सासूबाईंच्या जावयांबद्दल अर्थात माझ्या नणंदांच्या नवऱ्यांबद्दल जेव्हा सागरकडून ऐकलं होतं तेव्हा खरं तर माझा विश्वास बसला नव्हता पण आज मी प्रत्यक्ष अनुभवत आहे. आमच्या या घरातले दोन्ही जावई सागरच्या मोठया भावाच्या

भूमिकेतच अधिक असतात. सुख-दु:खात, अडचणीत तर ते कायम सोबत असतातच पण वेळप्रसंगी मला आणि सागरला योग्य सल्ला द्यायलाही ते कधीच मागे राहत नाहीत. मी जावयाची भूमिका पार पाडण्यासाठी सागरला नेहमी त्यांचाच आदर्श ठेवायला सांगत असते. तोही त्याच्या या नव्या भूमिकेला योग्य न्याय देण्याच्या पूर्ण प्रयत्नात असतो.

माझ्या आई बाबांना आम्ही दोनच मुली, त्यामुळे जावई मुलासारखे असावेत एवढीच त्यांची अपेक्षा होती. आमच्या लग्नाच्या या गेल्या सहा महिन्यांमध्ये माझ्या आई आणि नवऱ्यामध्ये एक अनोखं नातं निर्माण झालं आहे. काही दिवस एकमेकांशी बोललं नाही की त्यांना अस्वस्थ वाटू लागतं. एकाही रात्री फोनवर सागर आईला गुड नाइट म्हणाला नाही की हिला झोपही लागत नाही. याला जराही बरं वाटत नसलं की आई-बाबा लगेच आमच्या घरी यायला निघतात. आम्ही सगळे नुकतेच एका छोटयाशा सहलीला गेलो होतो. माझ्या आईला पायाचं खूप जुनं दुखणं असल्याने पायऱ्या चढ-उतर करताना कुणाच्या तरी आधाराची गरज लागते. या सहलीच्या वेळी हे काम तिचे दोन्ही जावई करत होते.

ती हॉस्पिटलमध्ये उपचार घेत होती तेव्हाही हे मुलाप्रमाणेच सगळी धावपळ करत होते. आता बाबांची एक छोटीशी ट्रीटमेंट करायची आहे त्यासाठीही चौकशी करण्यापासून बाबांची मानसिक तयारी करण्यापर्यंत माझ्यापेक्षा अधिक काळजी सागरच घेतोय. हे सगळं पाहिल्यानंतर आई-बाबांची मुलासारखा जावई असण्याची इच्छा बऱ्याच अंशी पूर्ण झाली याचं समाधान वाटतं.

आपल्या बायकोनं आपल्या आई-वडिलांकडे लक्ष द्यावं, त्यांना काय हवं-नको ते बघावं, त्यांच्याशी अगदी मुलीप्रमाणे राहावं अशी अपेक्षा जेव्हा नवरा ठेवत असतो तेव्हा आपल्या पत्नीच्याही आपल्याकडून तिच्या आई-वडिलांबद्दल अशाच अपेक्षा असू शकतात, याचा विचार व्हायला हवा. सासू-सासरे ही जशी सुनेची जबाबदारी आहे तशीच जावयाचीही आहे, हे मानणाऱ्या तरुणांची संख्या वाढतेय, ही चांगली बाब आहे. हा आपल्या समाजाच्या मानसिकतेतला सकारात्मक बदल म्हणायला हवा आणि या बदलाचं स्वागतच करायला हवं. सून ज्याप्रमाणे मुलगी बनून नवऱ्याच्या घरादाराला आपलं मानून, बनवून संसार करते त्याचप्रमाणे जावयाने तिच्या कुटुंबाची काळजी घेण्यासाठी मुलाची भूमिका घेण्याची जबाबदारी घ्यायलाच हवी. आपली मुलगी चांगली सून बनावी यासाठी मेहनत घेणाऱ्या आई वडिलांनी आपला मुलगाही पुढे जाऊन चांगला जावई बनावा यासाठीही प्रयत्न केले तरंच दोन्ही घरं सुखाने नांदत राहतात.

# वाचनप्रेमींचं घर

*असं म्हणतात ज्या घरात वाचनसंस्कृती नांदते ते घर खऱ्या अर्थी समृद्ध असतं. प्रत्येकाचे काहीतरी छंद असतातच पण वाचन हा केवळ छंद न उरता नकळत दैनंदिन जीवनाचा एक अविभाज्य भाग बनून जातो. आपले जवळचे जेव्हा आपल्या या आवडी-निवडींची काळजी घेऊ लागतात तेव्हा कुटुंबातल्या नात्यांनाही नवे पैलू पडतात. म्हणूनच आज आमच्या घरातल्या वाचनप्रेमी कुटुंबाबद्दल सांगतेय.*

माझी कायम अशी इच्छा होती कि माझा जोडीदार संगीत आणि पुस्तकांवर प्रेम करणारा असावा. त्याप्रमाणे संगीतप्रेमी नवरा तर मला मिळाला पण पुस्तकांवर त्याचं फारसं प्रेम नाही. असं असलं तरी माझ्या पुस्तकप्रेमावर मात्र त्याचं भरपूर प्रेम आहे. माझ्या वाचनात खंड पडू नये आणि मला सतत वेगवेगळं दर्जेदार वाचन करत राहता यावं यासाठी त्याची धडपड सुरु असते.

मला शाळेत असल्यापासूनच अवांतर (शालेय पाठ्यपुस्तकाव्यतिरिक्त) वाचनाची जी गोडी लागली ती आजवर कायम आहे, किंबहुना वाढत चालली आहे. घरात माझ्या पुस्तकांचा ढीग पाहून आई-बाबा नेहमी गमतीने म्हणायचे कि सासरी जाताना ही सगळी पुस्तकं सोबत घेऊन जा आणि मी खरंच तसं केलं. माझ्या रुखवतात माझ्या आवडीची पुस्तकं मी मांडण्यासाठी दिली होती आणि उरलेली एका बॉक्समध्ये भरून सोबत घेऊन आले. अशाप्रकारे माझ्या या घरात माझ्या

दुसऱ्याच दिवशी ऑफिसनंतर पुस्तकांची दुकानं धुंडाळून पुस्तकांची फारशी आवड आणि माहिती नसलेल्या माझ्या नवऱ्याने माझ्यासाठी चार नवी पुस्तकं आणली. ती मला देताना तो म्हणाला 'घे, तुझी पुस्तकं संपली होती ना! कुठल्याही परिस्थितीत तुझ्या वाचनात खंड पडता कामा नये. चांगलं वाचशील तर चांगलं लिहू शकशील ना!' त्या क्षणी मी थक्क झाले. माझं पुस्तकांवर अधिक प्रेम आहे कि याचं माझ्या वाचनावर अधिक प्रेम आहे हेच मला समजत नव्हतं.

सोबतच माझ्या पुस्तकांनीही प्रवेश केला. लग्नानंतर जवळजवळ महिनाभर ही सगळी पुस्तकं त्या बॉक्समध्येच पडून होती, त्यांच्याकडे पहायलाही उसंत नव्हती. पण मी पुन्हा ऑफिसला जाऊ लागल्यानंतर मात्र मला प्रकर्षाने त्यांची आठवण येऊ लागली; कारण मला प्रवासात वाचायची सवय आहे त्यामुळे पर्समध्ये एक पुस्तक न चुकता असतंच. आता मात्र खूपच चुकल्याचुकल्या सारखं वाटू लागलं होतं. मी तो बॉक्स काढून देण्यासाठी सागरच्या मागे तगादा लावला पण एवढी पुस्तकं ठेवायची कुठे हा प्रश्न होता म्हणून ते लांबणीवर पडत राहिलं. अखेर यावरचा तोडगा त्यानेच शोधून काढला. मी त्याला लग्नाआधी सांगितलं होतं कि घरात एक बुकशेल्फ (पुस्तकांचं कपाट) असावं अशी माझी खूप वर्षांपासूनची इच्छा आहे आणि आमच्या पहिल्या व्हेलेंटाईन्स डे ला त्याने माझ्यासाठी एक सुंदर बुकशेल्फ भेट म्हणून घरी आणलं. तेव्हा अखेर आमच्या घरातल्या पुस्तकांना त्यांची हक्काची जागा मिळाली.

माझ्या सुदैवाने या घरी वाचनाची आवड असणारे अनेक जण आहेत. त्यामुळे हे बुकशेल्फ घरी आल्यानंतर लगेचच आकर्षणाचा आणि उत्सुकतेचा केंद्रबिंदू ठरला मग कुणीही घरी आलं की पुस्तकं चाळणं, स्वतःकडची पुस्तकं संग्रही संग्रही आणून ठेवणं, सगळे एकत्र जमले असताना पुस्तकांवर हमखास चर्चा करणं हे सगळं सुरु झालं आणि बघता बघता आमच्या घराचा हा कोपरा आमच्या कुटुंबाचं एक छोटेखानी पुस्तकसंग्रहालय बनून गेला.

या संग्रहालयात अनेक विषयांवरची, अनेक प्रकारांची, वेगवेगळ्या लेखक-लेखिकांची अनेक इंग्रजी, मराठी पुस्तकं एकमेकांच्या आधाराने ऐटीत उभी आहेत. माझ्या सासूबाईंपासून नुकतीच दहावीची परिक्षा दिलेल्या माझ्या भाचीपर्यंत आणि अगदी तिच्याहूनही लहानांसाठीही प्रत्येक वयोगटासाठी वाचायला इथे काही न काही सापडतच. त्यामुळेच रविवारी दुपारी अनेकदा आमच्याकडे जणू वाचन चळवळ सुरु झाल्यासारखी

भासते. काहीजण अपवाद वगळता प्रत्येकाचं कुठलंतरी पुस्तक सुरूच असतं. मग वाचून एकमेकांना सुचवणं, पुस्तकांची अदलाबदल करणं वगैरे आलंच!

गमतीचा भाग म्हणजे या बुकशेल्फचं मला कितीही कौतुक असलं तरी ते साफ करण्यासाठी मात्र मी काही केल्या वेळ काढू शकत नाही. पण माझे सासरे मात्र नेमाने त्यावर आणि पुस्तकांवर बसलेली धूळ साफ करतात आणि आमच्या पुस्तकांचं जतन करतात.

असं म्हणतात ज्या घरात वाचनसंस्कृती नांदते ते घर खऱ्या अर्थी समृद्ध असतं. प्रत्येकाचे काहीतरी छंद असतातच पण वाचन हा केवळ छंद न उरता नकळत दैनंदिन जीवनाचा एक अविभाज्य भाग बनून जातो. आपले जवळचे जेव्हा आपल्या या आवडी-निवडींची काळजी घेऊ लागतात तेव्हा कुटुंबातल्या नात्यांनाही नवे पैलू पडतात. माझ्या सासूबाईंना वाचनाची खूपच आवड आहे. त्यामुळे पुस्तकं तर त्या वाचतातच पण माझं लेखनही त्या आवर्जून वाचतात. लग्नाआधीही माझे लेख प्रकाशित झालेली मासिकं, वर्तमानपत्र त्यांच्याकडे वाचायला पाठवून दिले होते. मी वस्तू सांभाळून ठेवण्याच्या बाबतीत थोडी हलगर्जी आहे. याचा कहर म्हणजे माझ्या प्रकाशित झालेल्या सर्वच लेखांच्या प्रती मी काही सांभाळून ठेऊ शकले नाही किंवा त्या असतील तरी एकाच ठिकाणी जमा करून ठेवलेल्या नाहीत. याउलट इथे मात्र बाबांनी माझं प्रकाशित झालेलं प्रत्येक काम अगदी तारखेप्रमाणे व्यवस्थित जपून ठेवलं आहे.

माझ्याकडे एकाच लेखकाच्या पाच पुस्तकांचा एक संच होता. त्यातलं एक पुस्तक काही वर्षांपूर्वी कुणीतरी नेलं ते काही परत आलंच नाही., त्यामुळे आता बुकशेल्फमध्ये तो संच अर्धवट दिसू लागला म्हणून मी अस्वस्थ झाले. तेव्हा माझ्या नवऱ्याने शोधाशोध करून ते पुस्तक विकत आणून गुपचूप त्या संचात ठेवलं. घरी आल्यावर जेव्हा माझ्या ही गोष्ट लक्षात आली तेव्हा त्याचं फार कौतुक वाटलं. त्याचे असे अनेक किस्से आहेत. मागे असंच मला एक पुस्तक मिळता मिळत नव्हतं आणि मी जणू त्याच्यासाठी हट्टच धरून बसले होते. अगदी त्या प्रकाशकाच्या वितरकानेही ते त्यांच्या स्टॉकमध्ये ते उपलब्ध नसल्याचं सांगितलं तेव्हा सागरने त्यांचा पाठपुरावा केला. अखेर वितरकाच्या माणसाने ते

पुस्तक आम्हाला घरपोच आणून दिलं. मला हव्या असलेल्या एका पुस्तकासाठी माझ्या नवऱ्याने खूप आटापिटा केला.

काही दिवसांपूर्वी मी त्या बुकशेल्फसमोर उभी राहून आता काय बरं वाचू? यातलं जवळजवळ सगळंच वाचून झालंय असं म्हणत होते आणि दुसऱ्याच दिवशी ऑफिसनंतर पुस्तकांची दुकानं धुंडाळून पुस्तकांची फारशी आवड आणि माहिती नसलेल्या माझ्या नवऱ्याने माझ्यासाठी चार नवी पुस्तकं आणली. ती मला देताना तो म्हणाला 'घे, तुझी पुस्तकं संपली होती ना! कुठल्याही परिस्थितीत तुझ्या वाचनात खंड पडता कामा नये. चांगलं वाचशील तर चांगलं लिहू शकशील ना!' त्या क्षणी मी थक्क झाले. माझं पुस्तकांवर अधिक प्रेम आहे कि याचं माझ्या वाचनावर अधिक प्रेम आहे हेच मला समजत नव्हतं. पण माझ्यासाठी ही आयुष्यभर जपून ठेवण्यासारखी एक सुखद, सुंदर आठवण आहे.

वाचनाची आवड कुणी लावली, कशी लागली ते आठवत नाही पण शाळेतल्या शिक्षकांनी आणि बाबांनी त्याला खतपाणी घातलं एवढं नक्की! पण मी काय वाचलं पाहिजे याबाबत कुणाचीही लुडबुड नव्हती. त्यामुळे तेव्हा जी पुस्तकं नकळत माझ्या जीवाभावाची झाली, ती कायमची! आज माझ्या जिव्हाळयाची माणसं माझं पुस्तकप्रेम जपण्यासाठी खटाटोप करतायत याचं समाधान मोठं आहे. ही वाचनसंस्कृती आमच्या घरात अखंड नांदत राहो आणि आमचे विचार समृद्ध करत राहो, अशीच सदिच्छा मनी आहे.

# नेटवर्किंगच्या जाळयात

*सोशल नेटवर्किंग हा शब्द आजच्या जगात काही नवीन नाही. लहानांपासून वयोवृद्धांपर्यंत सगळेच कुठल्या न कुठल्या प्रकारे या जाळयात अडकलेत. 'सोशल कनेक्ट' निर्माण करण्यासाठी उदयाला आलेलं हे महाजाल प्रसाराचं प्रभावी माध्यम बनलं एवढंच नाही तर आपल्या दैनंदिन जगण्याचा अविभाज्य भाग बनलं. पुढे काहींनी या सोशल नेटवर्किंगचा उपयोग प्रेमात पडण्यासाठी केला, कुणी प्रेम व्यक्त करण्यासाठी तर कुणी प्रेमभंग करण्यासाठी! आमच्याही कहाणीत अशा सोशल नेटवर्किंग साइट्स आणि ॲप्लिकेशन्सचा काही वाटा आहे, आज थोडं त्याबद्दल!*

सोशल नेटवर्किंगचं जाळं आपल्या देशात कोळयाच्या जाळय़ासारखं झपाटय़ानं पसरत गेलं आणि त्याने आपल्या सामाजिक जीवनाचा नवा पैलू निर्माण केला. या पूर्वीपर्यंत नातेवाईक, मित्र परिवार, आजूबाजूच्या परिसरात राहणारे एवढय़ावरच आपली समाजाची व्याख्या मर्यादित होती. पण आता दूरचे नातेवाईक, बऱ्याच वर्षापूर्वी दुरावलेले मित्र-मैत्रिणी, त्यांचं मित्रमंडळ, सिनेस्टार्स, खेळाडू, विचारवंत, लेखक, राजकारणी, जुने सहकारी, नवे व्यापारी एवढंच नाही तर दूरदेशी किंवा अगदी बाजूच्या इमारतीत राहणारं कुणीतरी अनोळखी, अशा सगळयांच्या महाजालात आपल्या सामाजिक जीवनाच्या कक्षा रुंदावत चालल्या आहेत. आपण 'सोशल' बनत आहोत. आज अगदी कुठूनही, कधीही, कुणाशीही सहज संपर्क साधता येऊ शकतो.

आमचं लग्न ठरताना जरी आम्ही सुरुवातीला दोघंच भेटलो होतो तरी त्याच्या घरातल्या सर्वानी, मित्र-मैत्रिणींनी, दूरवर राहणाऱ्या नातेवाइकांनी मला फेसबुकवर पाहून झालं होतं. माझा प्रोफाइल फोटो पाहूनच मी सर्वाना पसंत पडले होते, असं मला नंतर सांगण्यात आलं. त्यामुळे फेसबुकचा माझं लग्न ठरण्यात मोठा हात आहे, असं म्हटलं तर वावगं ठरणार नाही. मी फेसबुकची खूप जुनी रहिवासी आहे पण व्हॉट्सअॅप मात्र मी अनेक वर्ष टाळत होते. पण आमचं लग्न ठरलं आणि कायम संपर्कात राहण्यासाठी आम्ही व्हॉट्सअॅपचीच निवड केली. तेव्हा अगदी लग्न होईपर्यंत आम्ही दोघंही मोबाइलशिवाय दिसणं दुर्मीळ झालं. छोटय़ा-छोटय़ा गोष्टी एकमेकांना सांगणं, लग्नाची खरेदी दाखवणं वगैरे सगळया गोष्टी इथेच सुरू झाल्या. सकाळी उठल्यापासून रात्री झोपेपर्यंत आम्ही व्हॉटसअॅपच्या माध्यमातून कायम एकत्र होतो. त्याचे मित्र आणि त्यांच्या बायका असा

आमचा धम्माल ग्रुपसुद्धा व्हॉटसअ‍ॅपवर दिवसरात्र एकमेकांशी गप्पा मारत असायचा. कालांतराने मी त्यातून बाहेर पडले ती परत काही गेलेच नाही.

असो, पण लग्नानंतर अर्थातच या संभाषणाच्या वेळा आणि विषय यात फरक पडला. सतत एकमेकांशी बोलत राहिल्याने इतर चर्चा सुरू झाल्या, चर्चांचं रूपांतर नकळत विवाद मग वाद आणि अखेर भांडणांमध्ये झालं. तेव्हा वेळ आली आत्मपरीक्षणाची!

आम्हा दोघांच्याही हे लक्षात यायला वेळ लागला नाही की हे सगळं व्हॉटसअ‍ॅपच्या अतिवापरामुळे होतंय. सतत एकमेकांशी बोलत राहिल्याने संभाषणातलं नावीन्य संपून विषय भरकटतात, त्यातून वाद होतात. शिवाय कामात असताना एकीकडे हा विसंवाद घडत असेल तर उगीच चिडचिड होते. अशा परिस्थितीत इतरांचे आलेले मेसेजेससुद्धा वैतागवाणे वाटू लागतात. यावरचा तोडगा म्हणून आम्ही दोघांनीही आपल्या मोबाइलमधून व्हॉटसअप काढून टाकलं. वाद चमत्कारिकरीत्या बंद झाले. आता एकमेकांशी बोलावंसं वाटलं की फोन करण्यावाचून पर्याय नव्हता. थेट बोलण्यामुळे विषयाला फाटे फुटत नव्हते आणि वेळेची मर्यादा असल्यामुळे नेमकं तेच बोलणं होऊ लागलं आणि त्याचं अधिक महत्त्व वाटू लागलं.

असं असलं तरी काही काळानंतर आम्हा दोघांनाही व्हॉटसअ‍ॅप बंद केल्यामुळे संपूर्ण जगाशी संबंध तुटल्यासारखं वाटू लागलं, मित्र-मैत्रिणींशी-भावंडांशी संवाद बंद झाला होता, कारण या मेसेजिंग अ‍ॅप्लिकेशन्समुळे कुणालाही फोन करून बोलण्याची सवय पुरती मोडली आहे. एकदा ट्रेनमध्ये दोन बायका एकमेकींना व्हॉटसअ‍ॅप वापरण्याचे धडे देत होत्या ते पाहून तर मला उगीच खजील झाल्यासारखं वाटलं. आम्हा दोघांच्याही हातात स्मार्टफोन्स असूनही आम्ही मात्र 'नॉट सो स्मार्ट' ठरत होतो. गंमत अशी होती की, दोघांच्याही मनात ही गोष्ट सलत होती. सांगण्याची सोय मात्र नव्हती कारण त्यावरून पुन्हा वाद होण्याची भीती होती. अखेर एकदा बोलता बोलता हा विषय निघाला आणि पुन्हा व्हॉटसअ‍ॅप सुरू करण्याला दोघांनीही सशर्त मंजुरी दिली.

अट अशी होती की, ऑफिसमध्ये असताना एकमेकांशी फार चॅट करायचं नाही कारण त्याने लक्ष विचलित होतं आणि कामावर परिणाम होतो. या एक महिन्याच्या व्हॉटसअ‍ॅप ब्रेकमुळे आम्हाला एकमेकांना दिवसातून एकदा तरी एकमेकांना फोन करून बोलण्याची सवय लागली, शिवाय मेसेजिंग अ‍ॅप्स वापरण्याच्या मर्यादा उमगल्या असं

म्हणायलाही हरकत नाही. केवळ एका मोबाइल ॲप्लीकेशनचा आपल्या आयुष्यावर केवढा प्रभाव पडू शकतो, हीच खरं तर आश्चर्याची आणि आत्मचिंतनाला उद्युक्त करणारी बाब आहे.

केवळ मोबाईल ॲप्लीकेशनच नाही तर संपूर्ण सोशल मीडिया नामक जाळयानं आपल्याला वेढून टाकलं आहे. मी ऑर्कुट असल्यापासून या सगळया जाळयात स्वत:ची जागा बनवत राहिले. विशेष म्हणजे ऑर्कुट आणि फेसबुकच्या सुरुवातीच्या काळात झालेले माझे मित्र-मैत्रिणी आजवर कायम टिकलेत. पण आता मात्र इथल्या मैत्रीची परिमाणं बदललेली दिसतात. बेसावधांसाठी ही ठिकाणं अधिक धोकादायक बनली आहेत.

मजेची गोष्ट म्हणजे, माझ्या काही छोटय़ा मित्रमैत्रिणींना फेसबुक, व्हॉटसॲप इत्यादी गोष्टी अनादी काळापासून अस्तित्वात होत्या असंच वाटत होतं. पण नुकताच फेसबुकचा १०वा वाढदिवस जगभर साजरा झाला आणि त्यांचा फार मोठा गैरसमज दूर झाला.येणाऱ्या काळात या साधनांना आणखी अद्ययावत यंत्रणांची साथ लाभेल. तंत्रज्ञानामुळे माणूस दुरावतो, एकलकोंडा होतो हा समज सोशल नेटवर्किंग पूर्णपणे पुसून टाकतो. अर्थात, कुठल्याही गोष्टीच्या पूर्ण आहारी जाणं कधीही चूकच आहे. त्यातून उद्भवणाऱ्या वादांच्या आठवणी कितीही नकोशा असल्या तरी त्या बरंच काही शिकवून जाणाऱ्या असतात. रोज एक नवं पाऊल टाकणाऱ्या आणि नवं आव्हान घेऊन समोर उभ्या ठाकणाऱ्या या जगात काळाबरोबर नुसतं चालून भागणार नाही तर त्याला आत्मसात करून जगणं अपेक्षित आहे.

# मैत्र जीवाचे

*लग्नानंतर मुलींच्या मित्र-मैत्रिणी दुरावतात हे सर्वमान्य आहे. पण मुलांच्या बाबतीतही असं होतं हे ही तितकंच खरं आहे. लग्नाआधी मित्र म्हणजेच सर्वस्व वाटणाऱ्या मुला-मुलींचं प्राधान्य लग्नानंतर बदलतं आणि तेव्हा मैत्रीची खऱ्या अर्थाने किंमत कळते, असं मी नुकत्याच आलेल्या अनुभवावरून म्हणू शकते. आज थोडं लग्नानंतर मित्र-मैत्रिणींशी होणाऱ्या ताटातुटीबद्दल-*

असं म्हणतात की, आयुष्याच्या प्रत्येक टप्प्यावर मित्र भेटतात, पण जे या सर्व टप्प्यांवर सोबत असतात तेच खरे मित्र! मला हे अगदी खरं वाटतं कारण हे आपण सर्वांनीच अनुभवलं आहे. मला वाटतं, जसं चांगली नोकरी, चांगली बायको किंवा नवरा आणि चांगले शेजारी नशिबात असावे लागतात तसंच चांगले मित्र-मैत्रिणीही नशिबानेच मिळतात. मित्र बनवता आले पाहिजेत, त्यासाठी मनमोकळा स्वभाव पाहिजे, असं जे म्हणतात ते अगदी खोटं आहे कारण मित्र बनवावे लागत नाहीत, ते सहज होतात आणि अगदी घुम्या, अबोल माणसांचेही घनिष्ट मित्र असलेले मी पाहिले आहेत.

साधारण निरीक्षणावरून असा निष्कर्ष काढला जातो की, मुलांची मैत्री मुलींपेक्षा अधिक टिकते, त्याचं एक कारण असंही असू शकतं की त्यांचा लग्नानंतर पत्ता बदलत नाही, याशिवायही इतर अनेक कारणं आहेतच. बायको घर सांभाळते आहे म्हटल्यावर नवरा मित्रांसोबत फिरायला मोकळा असतो कारण ऑफिसनंतर त्यानं घरातली कामं करावी अशी अपेक्षा नसते. जी बायकोकडून अगदी सहज केली जाते. आता हे वाचताना अनेक जणींना तो प्रसंग आठवत असेल, जेव्हा कधी नव्हे ते मैत्रिणीसोबत बाहेर गेलेलं असताना परतायला उशीर होऊन रात्रीचं जेवण उशिरा ताटात पडल्यानं नवऱ्यासकट सासरी सगळ्यांनी आकांडतांडव केला आणि तेव्हापासून आता कधीही मैत्रिणींसोबत बाहेर जायचं नाही, असं तुम्ही मनोमन ठरवलं आणि आजवर पाळताय.

सुदैवाने आता बऱ्याच ठिकाणी ही परिस्थिती बदललेली पाहायला मिळते. आता बायका सर्रास किटी पार्टी, भिशी, बचत गट, महिला मंडळ, भजनी मंडळ, मंगळागौर ग्रुप अशा एक ना अनेक ठिकाणी मैत्रिणी जमवतात. दुपारच्या वेळी भेटून गप्पा मारतात (गॉसिप म्हणतात ना ते!), सहलींना जातात, काही जणी तर सामाजिक कार्यही करतात. अरे हो, आजकाल तर व्हॉट्सॲपवर ग्रुपही बनवतात. ऑफिसच्या, ट्रेनमधल्या मैत्रिणींचे, नवऱ्याच्या मित्रांच्या बायकांचे, सोसायटीतल्या बायकांचे, मुलाच्या मित्र-मैत्रिणीच्या आईचे असे अनेक ग्रुप्स आपण बायका जमवत असतो. पण या सगळया गोतावळयात अनेकदा अभाव आढळतो तो निखळ मैत्रीचा!

मनातलं बोलायला आणि सुख-दु:ख वाटून घ्यायला एक सखी प्रत्येकीलाच असावी लागते, ती आपण अशा मार्गानी सतत शोधत राहतो. पण ती सापडतेच असं नाही. पुरुषांच्या बाबतीतही अनेकदा हेच होत असतं. म्हणूनच मी म्हणते की चांगले सवंगडी लाभायला भाग्यवान असावं लागतं. माझ्या बाबतीतही वर म्हटलंय तसंच घडतं. आयुष्याच्या प्रत्येक वळणावर नवे मित्र-मैत्रिणी भेटतात पण कायम टिकून राहतील असे अगदी मोजकेच आहेत. खरं तर माझा स्वभाव खूप मनमोकळा आहे, मी समोरच्या माणसाला पटकन बोलतं करू शकते पण तरीही मला आजवर तात्पुरता किंवा पुढे ज्यांच्याशी फार संपर्क राहत नाही असाच गोतावळा मिळत राहिला. जो हिंडण्या-फिरण्याचा, मजा करण्याचा ग्रुप होता त्यातल्या एकेकींची लग्न होऊन त्या आपापल्या संसारात रमल्या. एकीला तर नुकतंच मूलही झालं, आता कधी आमची भेट झाली तर अनेक वर्षानीच होईल. फोन आणि चॅटमधून संपर्क राहील हीच त्यातल्या त्यात जमेची बाजू म्हणायची!

ही फक्त माझीच गोष्ट नाही, शाळा-कॉलेजमधल्या मैत्रिणी लग्नानंतरही कायम वरचेवर भेटत राहिल्या असं फार कमी पाहायला मिळतं. पण केवळ मुलीच नाही तर मुलंही लग्नानंतर मित्रांपासून काही प्रमाणात का होईना दुरावतात हे सत्य आहे. सागर माझ्यासारखा सगळयांशीच पटकन जाऊन बोलतही नाही पण एकदा नीट ओळख झाली की

त्याला कुणी थांबवूही शकत नाही. त्याच्या लाघवी स्वभावामुळे त्याचा मित्रपरिवार मोठा आहे. अगदी दोन-अडीच वर्षांपूर्वी सोडलेल्या ऑफिसमधले असोत की कॉलेजमधले मित्र-मैत्रिणी, तो आजही सगळयांना तितकाच जवळचा वाटतो. मला स्वत:ला कधी असे मित्र-मैत्रिणी लाभले नाहीत त्यामुळे या सगळयाचं मला फार कौतुक, अप्रूप वाटतं. पण आधी नियमित भेटणारे त्याचे असे अनेक ग्रुप्स लग्नानंतर थोडे दुरावले. त्याचं क्रिकेट खेळायला जाणं बंद झालं त्यामुळे परिसरातल्या मित्रांशीही रस्त्यात भेटल्यावर बोलण्यापलीकडे त्याचा संबंध उरला नाही, याची खंत वाटते. मी त्याच्याकडे ती अनेकदा बोलूनही दाखवली आहे, पण आता मला तुझ्यावरच लक्ष केंद्रित करायचंय, असं तो प्रत्येक वेळी म्हणतो आणि त्यावर मी काहीच बोलू शकत नाही.

जोवर आपलं लग्न झालेलं नसतं तोवर आपण इतर विवाहित मित्र-मैत्रिणींना याबाबत टोमणे मारत असतो पण ती वेळ कधी न कधी आपल्यावरही येतेच. लग्नानंतर मित्र-मैत्रिणींना भेटण्याची इच्छा नसते असं नाही पण आपलं प्राधान्य बदललेलं असतं. नुकताच घडलेला किस्सा सांगते. सागरच्या जुन्या ऑफिसमधल्या मित्रांची रविवारी प्रमोशनबद्दलची लंच पार्टी होती. त्यांची बऱ्याच महिन्यांत भेट झाली नसल्यानं सागरला आवर्जून बोलावलं. अगदी रोज ग्रुपमधल्या कुणातरी एकाचा फोन येत होता, पण नेमकं त्याच रविवारी आमचा सहकुटुंब त्याच्या मामाकडे जाण्याचा बेत आधीच झालेला होता आणि तोही लग्नानंतर बराच लांबणीवर पडून अखेर ठरला होता. त्याला मित्रांसोबत जाण्याची प्रचंड इच्छा असूनही मामाकडे येण्यालाच प्राधान्य द्यावं लागलं आणि तेही हसतमुखानं!

या प्रसंगाचं मला खूप वाईट वाटलं. त्याच्याही मनाला खूप रुखरुख लागून राहिली. आपल्या सगळ्या मित्रांपासून आपण दुरावलोय ही जाणीव त्याला त्रास देऊ लागली आणि परवा त्याच्या कॉलेजच्या ग्रुपमधले मित्र अचानक आमच्या घरी येऊन धडकले. आम्हा सगळयांसाठी तो सुखद धक्का होता. चांगल्या दोन-तीन तास गप्पा मारून, चहा-पाणी, दंगामस्ती करून ते निघाले. त्यांना सोडायला गेलेला सागर आणखी काही

मित्रांना भेटून परत आला आणि तो जेव्हा परत आला तेव्हा अनेक दिवसांपासून मित्रांच्या आठवणीने व्याकूळ असलेला त्याच्या मनातला एक कोपरा आनंदाने भरून गेला होता आणि तो आनंद त्याच्या चेहऱ्यावर लपत नव्हता. त्याला अजूनही असं वाटत असेल की त्या सगळ्यांना मी गुपचूप बोलावलं होतं पण तसं नव्हतं. ते आले होते ते मित्राच्या आणि मित्रत्वाच्या ओढीने! आपला मित्र आपल्याशी बोलू शकत नाही, भेटू शकत नाही तर आपणच जाऊन त्याची भेट घ्यावी, असा विचार करणाऱ्या मित्रांपेक्षा अधिक निर्भेळ मैत्री मी तरी आजवर पाहिली नव्हती.

आपल्याला जीवनाच्या प्रवासात अनेक माणसं भेटतात, नाती मिळतात पण ज्याला खरे मित्र भेटतात त्याने त्यांची कास कधीही सोडू नये, असं मला प्रामाणिकपणे वाटतं. लग्नानंतर नवऱ्याने मित्र-मैत्रिणींना भेटल्यावर, चिडचिड करणाऱ्या अनेक स्त्रिया मी अवतीभवती पहिल्या आहेत, पण यामागे मी माझ्या मैत्रिणींशी संपर्कात नाही तर तुही तुझ्या मित्रांशी राहायचं नाही, असा विचार करणाऱ्या अधिक आहेत. असो, कुणाच्याही अडवण्यानं किंवा संपर्क कमी झाल्यानं मैत्री तुटत नाही. म्हणूनच मलादेखील जेव्हा कधी माझ्या मैत्रिणी भेटतील तेव्हा मनातली मैत्रीची भावना तसूभरही कमी झालेली नसेल याची खात्री वाटते.

नवरा-बायकोमध्ये मैत्री उमगायलादेखील अनेक वर्ष जावी लागतात किंवा कधी त्यानंतरही ती फुलत नाहीच. पण मला मात्र पहिल्या भेटीपासूनच सागरमध्ये मित्र लाभलाय आणि नवऱ्यामध्ये सापडलेली ही जिवाभावाची मैत्री मला आयुष्यभरासाठी पुरणार आहे यात शंका नाही.

# ई साहित्य प्रतिष्ठान

मित्रहो , कसं वाटलं पुस्तक? हे पुस्तक वाचताना जागोजाग जाणवतं, की , आनंद आपल्या अगदी हाताजवळ असतो. पण तो मिळवावा लागतो. आणि मिळवण्यासाठी तो द्यावा लागतो.

एकदा एका राजाने शंभर लोकांना जेवायला बोलावलं. गोल पंगत बसली. जेवण पण काय! मस्त साजुक तुपातले मोतीचूर लाडू. गरमागरम जिलेबी. कचोरी. बर्फ़ी, समोसे अन असंच सर्व ताट भरभरून. पण राजाने एक अटही घातली. कोणी हात कोपरातून वाकवायचा नाही. आणि ताटाकडे तोंड न्यायचं नाही. समोर हे हे हे पदार्थ. आणि हात वाकवायचा नाही तर खायचे कसे?

मग त्यातल्याच एकाला युक्ती सुचली. त्याने शेजाऱ्याच्या ताटातला लाडू उचलला आणि हात न वाकवता शेजाऱ्यालाच भरवला. आणि म्हणाला "हूं ..." त्याबरोबर शेजाऱ्यानेही त्याचे अनुकरण करत पलिकडच्या शेजाऱ्याला लाडू भरवला. असे होता होता सगळे जण ढेकर देईतो जेवले.

व्यवहारातही असंच आहे. आपल्याला काही हवं असेल तर आपणही दुसऱ्याला द्यायला हवं. आपल्याला जे जे काही मिळालंय ते ते दुसऱ्या कोणीतरी निर्माण केलंय याची जाणीव हवी. अगदी मताचा अधिकार असो वा देवीची लस. कोणतीच गोष्ट आपोआप मिळत नाही. प्रत्येकाचं मूल्य असतं. कोणीतरी ते चुकवत असतं.

ई साहित्य प्रतिष्ठानची पुस्तकं विनामूल्य मिळतात. पण ती लिहिण्यासाठी लेखकांचे कष्ट व बुद्धी लागलेले असतात. आणि या एकेका पुस्तकाची किंमत म्हणुन लेखक हजारो लाखो रुपये मिळवू शकतात. पण मराठी वाचकांना विनामूल्य पुस्तकं मिळावित, व मराठीत वाचन संस्कृती वाढावी म्हणून असंख्य लोक प्रयत्न करीत आहेत. या प्रयत्नांत ई साहित्य प्रतिष्ठान व हे सर्व लेखक सहभागी आहेत. आपण या अभियानात सहभागी झालात का?

आपण ई साहित्य प्रतिष्ठानचे VIP सभासद झालात का?

VIP सभासद बनणं अगदी सोप्पं आहे.

आपल्या ओळखीच्या दहा लोकांचे मेल आय डी कळवा आणि बना VIP सभासद.

एका दमात तीन कामं.

1. पहिलं म्हणजे तुम्ही VIP सभासद बनता. तुम्हाला ई साहित्य प्रतिष्ठानचं पुस्तक ई मेलवर सर्वात आधी मिळतं. त्यांच्या कार्यक्रमाचं आमंत्रण मिळतं. त्यांच्या योजनांची माहिती मिळते. त्यांच्या कामात स्वतः सहभागी होण्याची संधी मिळते.

2. ज्या दहा किंवा अधिक मित्रांना तुमच्यामुळे फ़्री पुस्तकं मिळतात ते खुश होतात. त्यांना त्यांच्या आवडीची पुस्तकं मिळाली की ते इतर लोकांना तुमच्याबद्दल सांगतात. त्यांच्यासाठी तुम्ही म्हणजेच ई साहित्यचे प्रतिनिधी बनता.

3. यातून तुम्ही मराठी भाषेच्या संवर्धनाला अमूल्य असा हातभार लावता. आमचा उद्देश आहे मराठीतल्या सहा कोटी साक्षरांना वाचक बनवणं. आणि हे लक्ष्य साध्य करणं हे केवळ आणि केवळ मराठी लोकांना त्यांच्या भाषेवर असलेल्या प्रेमातूनच शक्य आहे. आपल्या भाषेचं राज्य व्हावं म्हणून १०६ हुतात्मे झाले. आपल्या भाषेनं राजा व्हावं म्हणून आपण एक दहा-वीस ई मेल आयडी देणारच ना! वाचनाची आवड असो वा नसो. फ़क्त मराठी साक्षर अशा दहा लोकांचे ई मेल पत्ते पाठवा. त्यांना वाचनाची आवड आपोआप लागेल. आपणच लावू. लावूच लावू. करूनच दाखवू.

आहे ना : एक दम : तीन कामं.

संपर्क साधा : esahity@gmail.com

ही सेवा पूर्णपणे निःशुल्क आहे. त्यामुळे आपले मित्र आपल्यावर खुश होतील. शिवाय आम्ही ही खात्री देतो की या ई मेल्सचा वापर फ़क्त आणि फ़क्त मराठी साहित्य पाठवण्यासाठीच केला जाईल. इतर कसल्याही जाहिराती पाठवून त्यांना त्रास दिला जाणार नाही. तेव्हा लवकरात लवकर आपल्या माहितीतल्या दहा किंवा अधिक मराठी साक्षरांचे ई मेल पत्ते आम्हाला द्या.

अधिक माहितीसाठी, आम्ही कोण ते जाणून घेण्यासाठी एकदातरी www.esahity.com या वेबसाईटला भेट द्या.

आपल्या पत्राची वाट पहात आहोत.

धन्यवाद

आपले नम्र

टीम ई साहित्य प्रतिष्ठान

